शिक्षणखात्याचा मंजुरी क्रमांक: पापुमं/१०९२/बा.म./१९५३२/(१) स दिनांक १३.४.१९९२



# इयत्ता सहावी

## मराठी

# बालभारती



महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

प्रथमावृत्ती : १९९४
पुनर्मुद्रण : २००६



मराठी भाषा समिती :
डॉ. मधुकर आष्टीकर, अध्यक्ष
डॉ. भाऊ मांडवकर, सदस्य
श्री. दया पवार, सदस्य
श्री. व्यंकटेश चौधरी, सदस्य
श्री. नरहर मंद्रुपकर, सदस्य
सौ. प्रतिभा जंगले, सदस्य
श्री. माधव राजगुरू, सदस्य सचिव

संयोजन : श्री. माधव राजगुरू, विशेषाधिकारी, मराठी
सहायक : सौ. उषादेवी देशमुख, विषय सहायक, मराठी

चित्रकार : श्री. जयप्रकाश जगताप, पुणे

मुखपृष्ठ : श्री. सतिश पाराशर

निर्मिती :
श्री. प्रमोद शिरोडकर, मुख्य निर्मिती अधिकारी
श्री. संजय कांबळे, निर्मिति अधिकारी

अक्षरजुळणी : अक्षर फोटोटाईपसेटर्स, यशोदा सदन, सखाराम कीर रोड, मुंबई-४०० ०१६.

कागद : ६० जी.एस.एम., क्रीम वोव्ह.

मुद्रणादेश : N / Tech - 2006 - 07 (1.00)

मुद्रक : Anand Publications Daman - Jalgaon

प्रकाशक :
प्रमोद शिरोडकर
नियंत्रक,
पाठ्यपुस्तक निर्मिती, गोरेगाव (प.), मुंबई ४०० ०६२

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे.
सारे भारतीय माझे
बांधव आहेत.
माझ्या देशावर माझे प्रेम आहे.
माझ्या देशातल्या समृद्ध आणि
विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे.
त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता
माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.
मी माझ्या पालकांचा, गुरूजनांचा
आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन
आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.
माझा देश आणि माझे देशबांधव
यांच्याशी निष्ठा राखण्याची
मी प्रतिज्ञा करीत आहे.
त्यांचे कल्याण आणि
त्यांची समृद्धी
ह्यांतच माझे
सौख्य सामावले
आहे.

# प्रस्तावना

'राष्ट्रीय शैक्षणिक धोरण-१९८६' अनुसार महाराष्ट्र राज्यात 'प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम-१९८८' तयार करण्यात आला.

या शासनमान्य अभ्यासक्रमावर आधारित मराठी भाषा विषयाची इयत्ता पहिली ते आठवीची नवीन 'बालभारती' माला १९८९-९० या शालेय वर्षापासून पाठ्यपुस्तक मंडळ क्रमशः प्रकाशित करत आहे. या मालेतील सहावे पुस्तक आपल्या हाती देताना आम्हांला विशेष आनंद वाटतो.

सहाव्या इयत्तेपासून शालेय अभ्यासक्रमाचा उच्च प्राथमिक स्तर सुरू होतो. मातृभाषेचा हा अभ्यासक्रम उच्च स्तर लक्षात घेऊन तयार केलेला आहे.

आकलन आणि अभिव्यक्ती उच्च पातळीवरून साधणे विद्यार्थ्याला शक्य व्हावे, हा उद्‌देश डोळ्यांपुढे ठेवून या पुस्तकातील पाठांची योजना केलेली आहे. प्रत्येक पाठाच्या शेवटी दिलेले प्रश्न आणि स्वाध्याय मातृभाषेच्या अभ्यासक्रमाची उद्‌दिष्टे साध्य करण्यास उपयोगी ठरतील.

सहाव्या इयत्तेत अपेक्षित असलेले व्याकरण पाठांच्या अनुषंगाने पाठानंतर लगेच देण्यात आलेले आहे.

विद्यार्थ्यांना शब्दकोश पाहण्याची सवय लागावी, म्हणून पुस्तकाच्या शेवटी पाठातील शब्दांचे अर्थ शब्दकोश पद्‌धतीने दिलेले आहेत.

महाराष्ट्राच्या सर्व भागांतील निवडक शिक्षक व शिक्षणतज्ज्ञ यांच्याकडून पुस्तकाचे समीक्षण करण्यात आले. त्यांच्याकडून आलेले अभिप्राय व सूचनांचा सांगोपांग विचार करून पुस्तकाला अंतिम रूप देण्यात आले आहे.

मंडळाची मराठी भाषा समिती व चित्रकार यांच्या आस्थापूर्वक परिश्रमांतून हे पुस्तक तयार झाले आहे. मराठी भाषा समितीला हे पुस्तक तयार करताना ज्या साहित्यिकांचे, तज्ज्ञांचे आणि निमंत्रित सदस्य श्री. व. द. देसाई यांचे सहकार्य लाभले, त्या सर्वांचे मंडळ मनःपूर्वक आभारी आहे.

या पाठ्यपुस्तकाचे अध्ययन व अध्यापन दर्जेदार व्हावे, यासाठी मंडळाने सदर पाठ्यपुस्तकाची अध्यापन पुस्तिकाही प्रकाशित केली आहे. अध्यापन उद्‌दिष्टाधिष्ठित होण्यासाठी शिक्षकांनी सदर पुस्तिकेचा अवश्य उपयोग करून घ्यावा.

विद्यार्थी, पालक व शिक्षक या पुस्तकाचे स्वागत करतील, अशी आशा वाटते.

सि अ टेवकर

पुणे,
दिनांक : ६ ऑगस्ट, १९९३
श्रावण १४, शके १९१५

**संचालक,**
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व
अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

# अनुक्रमणिका

गद्य-विभाग



# १. दमडी

**कुसुमावती देशपांडे** — लघुकथा, ललित लेख व साहित्यसमीक्षा या क्षेत्रांत मोलाची कामगिरी. 'दीपकळी', 'दीपमाळ', 'दीपदान' व 'मोळी' हे यांचे कथासंग्रह, 'पासंग' हा लेखसंग्रह व 'मराठी कादंबरीचे पहिले शतक' ही यांची गाजलेली पुस्तके.

'दमडी' ही कथा 'मोळी' या कथासंग्रहातून घेतलेली आहे. उपेक्षितांच्या जीवनाचे दर्शन या कथेत कुशलतेने घडवलेले आहे. मोलमजुरी करून जगणाऱ्या एका मुलीच्या स्वप्नाचे चित्रण मनाला चटका लावून जाते.

अडीच-तीन वाजण्याची वेळ. बर्डीच्या बाजाराच्या कोपऱ्यावर एक सार्वजनिक नळ होता व त्याच्या पलीकडे एक चिंचेचे विस्तीर्ण झाड होते. त्याच्याखाली दमडी निजली होती. त्या झाडाच्या वाकड्यातिकड्या पसरलेल्या जीर्ण मुळ्यांवर तिने डोके ठेवले होते. धुळीने धूसर झालेल्या तिच्या झिपऱ्या कपाळावरून गालांवर लोंबल्या होत्या. झाकल्या डोळ्यांच्या पापण्यांचे केस असूनही दिसत नव्हते. गालांची तर नुसती हाडे दिसत होती. हडकुळ्या खांद्यांवरून आलेल्या मळक्या चोळीची तिने जेमतेम गाठ मारली होती; कमरेला अर्धेमुर्धे, विटके लुगडे गुंडाळले होते आणि तिने त्याचा कसाबसा काचा खोचला होता. तिने आपले दहा-बारा वर्षांचे पोरसवदा अंग जमिनीवर टाकून दिले होते. तिच्याकडे पाहिले तर वाटावे, की ही केव्हाची गाढ झोपी गेली असावी; पण तसे नव्हते. तिने काही क्षणांपूर्वीच अंग टाकले होते. बाजारात ती एक तासापूर्वी तर आली होती.

आपल्या आजीबरोबर ती मोठ्या पहाटेच ठेक्याच्या वावरात गेली होती. तिच्या कमरेएवढ्या उंच वाढलेल्या गवताच्या पेंड्या तिला बांधू लागली होती. सोनेगावजवळच्या वावरात त्या वेळी कुणी चिटपाखरूही नव्हते. तिच्या

आजीच्या सप्सप् चालणाऱ्या विळ्याचाच आवाज त्या शांततेचा भंग करत होता. मधूनच एखादा सुतार पक्षी त्याला साथ करी. चांगले दोन-अडीच तास खपल्यावर त्यांचे भारे तयार झाले होते. ते ओल्या गवताचे लवलवते भारे डोक्यावर घेऊन त्या दोघी निघाल्या होत्या. दोन-अडीच मैल चालल्यावर कुठे अजनी जेलचे नाके दिसले, अन् अखेर बाजार...

तिथे पोचल्यावर मात्र आजीने तिला सुट्टी दिली होती. मग आपली भाकरीची गठडी घेऊन ती त्या सार्वजनिक नळावर गेली. हातपाय धुऊन भाकरी खायला बसली. एवढेसे तुकडे चघळत चघळत ती भाकरी खात होती. ती एक घास तोंडात घाली व भोवतालच्या साऱ्या पसाऱ्यावर आपली नजर भिरभिर फिरवी. जणू त्या भाकरीच्या तुकड्याबरोबर भोवतालचे सारे जीवन ती तोंडी लावत होती!



अर्र्र्र.... केवढ्या भर्र्रदिशी धावतात या मोटारी! अन् फसदिशी पाणी उडवतात मेल्या... या भाजीवाल्या चालल्या. सोनेगावच्च्याच तर दिसतात या... हो तर काय! ती नाही का गोप्याची माय... भल्ली भरली टोपली भेंड्यांनी! हाऱ्याच्या वर कशा गोलच गोल उभ्या करून दिल्यान्... जसे काही शिपाईच... त्या उडानखटुल्याच्या तळापाशी नाही का उभे राहत संगिनी घेऊन तशा. अन् त्या मोटारी तर अशा भारी.. अवघा रस्ता भरून टाकतात; बाजूंनी जाणाऱ्या माणसालाही आपल्या वाऱ्याने ओढून नेतात जणू... लोणीवाल्या उतरल्या बरं त्या झाडाखाली निंबाच्या... रामा रामा... केवढा कलकलाट त्यांचा! अडल्याशी झुंज घालतात जणू! अहा! काय न्यारा घमघमाट सुटलाय...

तिने मागे वळून पाहिले. तिच्या पाठीशीच शेव-भजीवाल्याची राहुटी होती. शेवेचा असा चरचरीत घाणा घातला होता त्याने! दमडीचा भाकरीचा



घास हातातच राहिला. विस्फारलेल्या डोळ्यांनी त्या तेवढ्या अंतरावरून त्याच्या कढईकडे ती पाहत राहिली. कोणीतरी मुंडासेवाला बाबा आला. त्याने दोन पैसे दिले. कागदात मूठ भरून शेव घेतली. पलीकडेच चार हातांवर जाऊन तो खात बसला. दमडीने सावकाशपणे डोळे वळवले. आपल्या भाकरीच्या फटकुराकडे पाहिले व हळूच हात उचलून तोंडात घातला. तिच्या जिभेवर जणू शेवेचे तुकडेच फिरत होते!

भाकरी खाऊन झाल्यावर तिने उठून आपले फटकूर झटकले. नळावर जाऊन कोपरापर्यंत पाण्याचे ओघळ घळघळा जाईतो ती ओंजळीने पाणी प्याली. फटकुरालाच हाततोंड पुसून चिंचेच्या झाडापाशी आली. मग तेच फटकूर चुंबळीसारखे उशाशी घेऊन झाडाच्या मुळ्यांवर डोके ठेवून झोपली. पाच मिनिटांतच तिला भोवतालच्या जगाचा विसर पडला आणि ती स्वप्नाच्या जगात शिरली.



...त्या स्वप्नात ती अखंड चालत होती. पावलामागून पाऊल टाकत होती. दृष्टीची झेप जाईल तिथवर तिला हिरवेगार गवतच दिसत होते. त्यातून वाट काढत, डोक्यावरचा जड, लांब भारा सावरत ती एकसारखी चालली होती. बरोबर आजी नव्हती, कोणीच नव्हते.

तिने डोक्यावर सहज हात नेला आणि काय मजा! तिच्या डोक्यावर गवत कुठे होते? काहीतरी लांब, पिवळे, कडक... गरम. त्याचाच सबंध भारा तिच्या डोक्यावर कोणीतरी दिला होता. अहाहा! शेव! खमंग, कुरकुरीत गरम शेव होती ती. तिच्या डोक्यावर होती. तिच्या हातानेच तिने धरली होती. त्यातली शेव खावी आपण. तिचा हात पुढे सरकला; पण लगेच भान आले, की डोक्यावरचा भारा दुसऱ्याच कोणाला द्यायचा असतो ना? पुन्हा ती स्वप्नातच चालू लागली...

दमडी निजली होती. एवढीही हालचाल होत नव्हती. तिच्या अंगावर चिंचेची पाने मधूनमधून पडत होती. आकाशात ढगांची शिवाशिवी चालली होती. वाऱ्याचे झोत येत-जात होते. मध्येच ऊन पडे, तर घटकेत वाटे, आता पाऊस कोसळणार. असाच एक थंड वाऱ्याचा झोत आला व चिंचेची गार पाने तिच्यावर बरसली,... पण तिचा स्वप्नप्रवाह चालूच होता. ती पुन्हा चालत होती.

आता स्वप्नात एक थबथबलेला गवताचा भारा तिच्या डोक्यावर होता. पायांत गोळे आलेले... सगळीकडे अंधार. प्रत्येक पावलाबरोबर भोवताली सळसळणारे गवत. तेवढ्यातच तिला त्या स्वप्नात आजी दिसली. तिच्या मागे जायचे ना? आजी तर फाटकातून आत चालली. चला चला. त्या बंगल्यावर चंदी आहे वाटते! दमडी फाटकातून आत शिरली. मागले दार उघडले गेले. दमडी भारा सावरीत गोठ्याकडे गेली. आजी भारे सोडत होती, तोवर दमडी गोठ्याच्या खांबाशी टेकून उभी राहिली. तिथून तिची दृष्टी स्वयंपाकघराच्या खिडकीतून आत शिरली. रसरशीत निखारे पेटले होते. त्यांची ऊब तिच्या दृष्टीलादेखील जाणवत होती. अरेच्या, कुणीतरी भाकरी भाजतंय वाटतं. अन्

भाजल्या जाणाऱ्या भाकरीचा केवढा खमंग वास पसरला होता! तेवढ्यात तिच्यापेक्षा एखाददुसऱ्या वर्षानेच लहान असलेल्या मुलीचा आतून आवाज आला, 'माझ्या भाकरीवर दूध पाहिजे, दूध!' पाहूया तरी! पण आजी तर फाटकातून बाहेर पडली, म्हणून दमडीही निघाली. आजीमागोमाग चालू लागली. अंधारातून.....गवतातून......

आता तिला स्वप्नातच कुठले तरी गाव दिसले. सोनेगाव का ते? सोन्याचे गाव! मावळत्या सूर्याच्या प्रकाशात चिंचोळ्या पायवाटेने वरवर चालली होती ती. मग शितळादेवीचे देऊळ लागले. पलीकडे मारुतीचे........ तो पाहा तो विठू, नारळ फोडतोय वाटतं तिथं... 'मला दे की रे थोडं.' 'हो तर, तुझ्यासाठीच तर फोडतो.' खोबऱ्याचा तुकडा, पांढरा स्वच्छ करकरीत. दाताखाली दाबला तर दूध निघतं नुसतं. दमडीने खोबरे घ्यायला हात चटकन पुढे केला. विठू म्हणत होता, 'हो हो. हा सगळाच्या सगळा तुकडा तुझ्यासाठीच आहे, दमडे. घे, सगळा घे, दमडे!'

पण त्याच वेळी 'दमडे...दमडे...' तिच्या आजीच्या हाका आल्या. भारे विकून, मीठ-मिरचीचा बाजार करून ती दमडीला उठवायला हाका मारीत होती. दमडी जागी झाली;... पण तिच्या डोळ्यांपुढे ते भाकरीचे, दुधाचे, खोबऱ्याचे स्वप्न तरळतच होते. क्षणभर पडल्या-पडल्याच ती आजीकडे पाहत राहिली. आजीने पुन्हा हाक मारली, 'दमडे अशी काहून पाहतं ग? ऊठ नं आता?'

दमडी उठली. आपले भाकरीचे फटकूर झटकून घेतले व ती आता खरोखरच चालू लागली. शेवेचा खमंग वास घेत बाजारचा रस्ता तुडवू लागली.

दीडदमडीचा चालता जीव तो.... असाच पुढल्या बाजारी चालत येईल व त्याच्या पुढल्या बाजारी.....आणि त्याच्या पुढल्याही.

**प्रश्न :**

**अ.** १. झाडाखाली झोपताच दमडीला कोणते स्वप्न पडले?

२ आजीने हाक मारली तेव्हा ती स्वप्नात काय पाहत होती?

३. 'दीडदमडीचा जीव तो' असे लेखिकेने का म्हटले आहे?

आ. खालील शब्दांना पर्यायी शब्द लिहा.

ढग, झाड, सूर्य, वारा, पक्षी, डोळा.

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. दमडीचे व्यक्तिचित्र तुमच्या शब्दांत लिहा.

२. तुम्हांला पडलेले एक अविस्मरणीय स्वप्न थोडक्यात लिहा.

३. या पाठाच्या आधारे तुमच्या मनाला अस्वस्थ करणारा एक विचार थोडक्यात लिहा.

४. दिवसभर खपून स्वप्ने पाहणाऱ्या मुलीचे दमडी हे नाव आणखी काय सुचवून जाते ते लिहा.

५. दमडीने शाळेत येऊन शिकावे यासाठी तुम्ही काय कराल?

६. दमडीसारख्या शाळेत न येऊ शकणाऱ्या मुलींसाठी शासन 'सावित्रीबाई फुले दत्तक-पालक योजना' राबवते. या योजनेची गुरुजींकडून माहिती मिळवा.

७. श्री. म. माटे यांचे 'उपेक्षितांचे अंतरंग' हे पुस्तक मिळवून वाचा.

८. हे लक्षात ठेवा.

- उघड्यावर तयार केलेले व ठेवलेले पदार्थ खाणे आरोग्यास अपायकारक असते.
- खाण्याचे पदार्थ ठेवण्यासाठी वापरलेला कपडा/डबा स्वच्छ असावा.
- जेवणापूर्वी व जेवणानंतर हात स्वच्छ धुवावेत.

**व्याकरण :**

हडकुळ्या खांद्यावरून आलेल्या मळक्या चोळीची तिने जेमतेम गाठ मारली होती.
वरील वाक्यातील कर्ता, कर्म, क्रियापद व क्रियाविशेषणे ओळखा आणि लिहा.





# २. ठोकळ्याचे चित्र

**य. गो. जोशी (यशवंत गोपाळ जोशी) —** सुप्रसिद्ध कथालेखक आणि प्रकाशक. 'तुळशीपत्र आणि इतर कथा' व 'पुनर्भेट' हे यांचे गाजलेले कथासंग्रह. 'वहिनीच्या बांगड्या' या लोकप्रिय ठरलेल्या चित्रपटाची कथा यांचीच होती. हा पाठ यांच्या 'पुनर्भेट : भाग-२' या पुस्तकातून घेतला आहे.

प्रस्तुत पाठात शिक्षण क्षेत्रातील काही उचित मूल्यांची अप्रत्यक्षपणे जाणीव करून दिलेली आहे. विद्यार्थ्यांतील सुप्त कलांना वाव द्यावा हे तत्त्व बरोबर असले, तरी वर्गातील शिस्त हा महत्त्वाचा पैलूदेखील त्या निमित्ताने डोळ्यांआड करता येणार नाही, हे समजावून दिलेले आहे.

टीपः- 'ठोकळ्याचे चित्र' याच नावाची आचार्य अत्रे यांची एक कथा आहे. ठोकळा आणि कथेचे शीर्षक तेच ठेवून ठोकळ्याची दुसरी बाजू या कथेत दाखवली आहे.

---

दोन टोल वाजले. तिसरा तास सुरू झाला. ड्रॉइंगचे मास्तर वर्गात शिरले. मुलांनी पुस्तके मिटून पिशव्यांत ठेवली. ड्रॉइंगच्या वह्या बाहेर काढल्या. मास्तरांनी पेन्सिली वाटल्या. काही पेन्सिलींची टोके मोडली होती. चाकू घेऊन मुले ती तासू लागली.

मास्तरांनी टेबलावर एक ठोकळा ठेवला होता. चौकोनी ठोकळा होता तो. मान वळवून एकदोनदा त्यांनी त्याच्याकडे पाहिले. ठोकळा जरा तिरपा केला. त्यांना समाधान वाटले.

''हं करा सुरवात! हा ठोकळा काढायचा आज. नीट बघा याच्याकडे! एक डोळा मिटा व पेन्सिलीने माप घ्या याचे. रेघा बारीक काढा. खोडाखोड करू नका. पट्टीने आखायचे नाही. हाताने रेघा काढायच्या!''

मुलांनी एक डोळा मिटून पेन्सिली नाकासमोर धरल्या. माना वाकड्या करून ती ठोकळ्याचे माप घेऊ लागली. मास्तर वर्गाच्या कोपऱ्यात उभे राहिले आणि ठोकळ्याकडे ऐटीने पाहू लागले. मधून मधून मुलांकडेही ते

पाहत होते.

"मास्तर, मी फूल काढू?" मागच्या बाकावरचा एक हडकुळा मुलगा उठला व त्याने भीत भीत विचारले.

"कोण म्हणतो फूल काढू? ठोकळा सांगितला आणि फूल काढू म्हणतो? बस खाली, ठोकळा काढ!"

मुलगा वरमून खाली बसला. नाकापुढे त्याने पेन्सिल धरली व तो ठोकळ्याचे माप घेऊ लागला. त्याचा हात थरथर कापत होता. तेवढ्यात दुसऱ्या बाजूच्या एका मुलाने तक्रार केली.

"मास्तर, हा ठोकळा काढत नाही. त्याने दुसरेच काहीतरी काढले आहे."

"कोण ठोकळा काढत नाही?" मास्तरांनी विचारले.

"मास्तर, हा दत्तू साने!" तक्रार करणाऱ्या मुलाने बोटाने दाखवले.

घाबरलेल्या डोळ्यांनी दत्तू साने भिरभिर पाहू लागला. वहीच्या पोटात त्याने चटकन चित्र लपवले आणि पेन्सिल नाकासमोर धरून तो मास्तरांकडे बघू लागला.

मास्तरांच्या नजरेतून ते निसटले नाही. डोळे गरगर फिरवत ते त्याच्याकडे



पाहू लागले. त्यांनी वही उचलून घेतली व आतून एक चित्र बाहेर काढले.

"तू काढत होतास हे चित्र?" मास्तरांनी विचारले.

दत्तू बोलला, "होय." तो शरमून खाली पाहत होता. त्यानेच चित्र काढले होते ते. सबंध सकाळ त्याने त्यासाठी घालवली होती व वर्गात पुरे केले होते त्याने ते.

एका झाडावर पोपट बसला आहे. खाली हिरवेगार गवत आहे. अधूनमधून फुले उमललेली आहेत. जवळून एक ओढा वाहत आहे, पाठीमागे डोंगराआडून सूर्य उगवत आहे असे चित्र होते ते. दत्तूने कशातूनही न पाहता ते काढले होते. असे चित्र त्याने पूर्वी कधी काढले नव्हते. इतका आनंद त्याला पूर्वी कधी झाला नव्हता.

पहिल्या दोन तासांत त्याने चित्राकडे किती तरी वेळा चोरून पाहिले होते. आज त्याला त्या चित्रावाचून काही सुचत नव्हते.

ड्रॉइंगच्या तासाला त्याने ते थोडे अपुरे राहिलेले चित्र पुरे केले होते. मास्तरांनी ते चित्र हातात घेतले. त्या चित्राकडे पाहून त्यांनाही फार आनंद झाला.

"खरंच दत्तू, हे चित्र तू काढलंस?"

"हो," दत्तूने लाजत उत्तर दिले.

मास्तरांनी आपल्या हातांनी दत्तूच्या पाठीवर शाबासकी दिली. नंतर मास्तरांनी वर्गाच्या सेक्रेटरीला हाक मारली आणि दत्तूने काढलेले चित्र फळ्यावर टांगून ठेवण्यास सांगितले. वर्गातली मुले आश्चर्याने थक्क झाली. दत्तू साऱ्याची चहाडी सांगणाऱ्या मुलाने तर 'आ' वासला! दत्तू साऱ्याचे चित्र फळ्यावर टांगले गेले. मास्तर टेबलापाशी गेले. क्षणभर खिडकीतून बाहेर पाहत त्यांनी कसला तरी विचार केला आणि हाक मारली, "दत्तू, इकडे ये."

दत्तू अजूनही शरमून एक पाय बाकाच्या दांडक्यावर टाकून वाकडातिकडा उभा होता. मास्तर का हाका मारीत आहेत हे त्याला कळेना. तो तसाच उभा राहिला.

"दत्तू," मास्तरांनी पुन्हा हाक मारली.

"काय?" दत्तू जागेवरून म्हणाला.

"इकडे ये."

दत्तू साने मास्तरांच्या टेबलाजवळ आला. मास्तर त्याच्याकडे पाहून हसले.

"बस ह्या खुर्चीवर," मास्तरांनी आपल्या खुर्चीकडे बोट दाखवत म्हटले.

वर्गात एकच हशा पिकला! दत्तू साने जास्तच शरमला.

"खुर्चीवर बस म्हणून सांगितले ना?"

दत्तू मुळूमुळू रडू लागला.

मास्तरांनी तिकडे लक्ष दिले नाही. अशात दोन मिनिटे गेली. दत्तूचे रडणे चालूच होते. अखेर मास्तरांनी रडक्या दत्तूला बळेच आपल्या खुर्चीवर बसवले. दत्तू खुर्चीच्या हातांवर आपले हात टाकून बसला. त्याचे मुळूमुळू रडणे चालूच होते. वर्गात हशा व गडबड जोरात चालू होती. मास्तरांनी आपली नजर एकदा वर्गावरून फिरवली व वर्गात एकदम शांतता पसरली. मास्तर फळ्याजवळ गेले आणि म्हणाले, "खरंच, किती सुंदर चित्र काढलं आहे दत्तूनं! पोपटाची चोच अगदी खऱ्यासारखी आहे."

मुलांनीही त्या चित्राची स्तुती चालवली. मास्तरांनी मुलांना पुन्हा एकदा गप्प केले आणि म्हणाले, "चित्र खरंच सुंदर आहे आणि दत्तूच्या वयाच्या मानानं तर ते फारच छान साधलं आहे! पण मुलांनो, चित्राच्या संबंधाने काय चूक आहे ती सांगा पाहू?"

बरीच मुले उत्तर देण्यासाठी उतावीळपणाने उठली. मास्तरांनी दत्तू सान्याकडे हसून पाहिले.

दत्तूने आपले रडे आवरले, डोळे पुसले आणि तो खुर्चीवरून धीटपणाने उठून उभा राहिला आणि म्हणाला, "मी सांगू?"

"सांगतोस? सांग पाहू."

"हेच चित्र जर मी सगळं घरी काढलं असतं आणि तासाच्या सुरवातीला

अगर तास संपल्यावर मी तुम्हांला दाखवलं असतं, तर ते चांगलं झालं असतं. आपण ठोकळ्याचं चित्र काढायला सांगितल्यावर मी शिस्त म्हणून ठोकळ्याचं चित्र काढायला पाहिजे होतं!'' साने अडखळत म्हणाला.

''दत्तू, तू खरा शहाणा आहेस. तू काढलेल्या या पोपटाच्या चित्रापेक्षा तू आता दिलेलं उत्तर फार चांगलं आहे !'' असे म्हणून मास्तरांनी आपले खिसे चाचपले. त्यातून किल्ल्या बाहेर काढल्या व आपले कपाट उघडून त्यांनी चित्रांचे एक पुस्तक बाहेर काढले. त्या पुस्तकावर दत्तूचे नाव लिहून त्याला बक्षीस दिले.

दत्तू आनंदाने उड्या मारत ते पुस्तक घेऊन आपल्या जागेवर जाऊन बसला.

नंतर मास्तर म्हणाले, ''मुलांनो, मुलांना त्यांच्या कलाप्रमाणे शिक्षण द्यावं असं म्हणतात, हे ठीक; पण दत्तू सान्याने हे चित्र वर्गात काढलं याबद्दल जर त्याला जाणीव दिली नसती तर उद्या त्या शेजारच्या बापटानं मोराचं चित्र काढलं असतं, कुणी आंबे काढले असते. आणि मी काढायला सांगितलेलं ठोकळ्याचं चित्र अखेर माझं मलाच काढावं लागलं असतं!'' इतक्यात तास संपल्याची घंटा झाली.

''दत्तू, ते फळ्यावरचं चित्र घेऊन जा!'' मास्तर म्हणाले. दत्तूने पाय उंच करून फळ्यावरचे आपले पोपटाचे चित्र काढून घेतले.

मास्तर त्याच्याकडे पाहतच होते. दत्तूने त्या चित्राकडे एकदा पाहिले. त्याचे डोळे पाण्याने भरून आले. त्याने आपल्या मनात कसला तरी कठोर निश्चय केला. आपल्या हाताने त्याने ते सुंदर चित्र फाडून टाकले. मास्तर म्हणाले, ''हे काय केलंस दत्तू?''

''मी उद्या घरी असंच चित्र काढीन. आतापेक्षा चांगलं येईल ते. मी उद्या पुन्हा तुम्हांला दाखवीन.''

''शाबास! मी ते फ्रेम करून वर्गातच लावून ठेवीन.''

मास्तरांना दत्तू सान्याचा अभिमान वाटला.

**प्रश्न :**

अ. १. दत्तू सानेने आपले चित्र वहीच्या पोटात का लपवले?

२. मास्तरांनी दत्तूला चित्रांचे पुस्तक बक्षीस का दिले?

३. दत्तू सानेने मनात कोणता कठोर निश्चय करून आपले चित्र फाडले?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. २६ जानेवारी रोजी आयोजिलेल्या विविध स्पर्धांपैकी तुम्ही कोणत्या स्पर्धेत मनापासून भाग घ्याल व का?

२. ड्रॉइंगच्या तासाला तुमच्या वर्गात घडलेल्या एखाद्या गमतीदार घटनेचे वर्णन करा.

३. 'ठोकळ्याचे चित्र' या पाठातील मध्यवर्ती कल्पना स्पष्ट करा.

४. छंद जोपासणे आणि वर्गात शिस्त पाळणे, यांचा मेळ दत्तू सानेच्या मते कसा बसवता येतो ते तुमच्या शब्दांत सांगा.

५. या पाठाला दुसरे शीर्षक सुचवा.

६. दत्तू सानेचे व्यक्तिचित्र तुमच्या शब्दांत लिहा.

७. खाली काही कला व त्यांची माध्यमे दिलेली आहेत, त्यांची योग्य जुळणी करा.
कला— चित्रकला, मूर्तिकला, गायनकला, नाट्यकला, वादनकला.
माध्यम—सतार, मृत्तिका, रंग, स्वर, अभिनय.

**व्याकरण :**

मास्तर मी फूल काढू मागच्या बाकावरचा एक हडकुळा मुलगा उठला त्याने भीत भीत विचारले कोण म्हणतं फूल काढू ठोकळा सांगितला आणि फूल काढू म्हणतो बस खाली ठोकळा काढ

१. वरील परिच्छेद योग्य ती विरामचिन्हे वापरून पुन्हा लिहा.

२. वरील परिच्छेदातील मी, त्याने, कोण या सर्वनामांचे प्रकार ओळखा.

३. वरील परिच्छेदातील काढू, उठला, सांगितला, म्हणतो आणि काढ या क्रियापदांचे प्रकार ओळखा.





# ३. अहमदभाई

**चिं. त्र्यं. खानोलकर (चिंतामण त्र्यंबक खानोलकर)** — कादंबरी, नाटक, कविता, कथा असे विविध वाङ्मयप्रकार यांनी यशस्वीपणे हाताळलेले आहेत. 'आरती प्रभू' या टोपण नावाने ते कविता लिहीत.

'दीपमाळ' या व्यक्तिचित्रांच्या पुस्तकातून हा पाठ घेतलेला आहे. अहमदभाईंच्या स्वभावातील विविध मानवी छटा हळुवारपणे चितारताना त्यांचे प्रसन्न व्यक्तिमत्त्वही त्यांनी नीटसपणे रेखाटलेले आहे.

अहमदभाईंची दाढी सुरेख! वाटते की सदासर्वकाळ त्या दाढीवर सकाळची कोमल किरणे पडलेली आहेत. एखाद्या दुर्मिळ दागिन्यासारखी ही दाढी अहमदभाईंना मिळालीय. ही दाढी जर कदाचित कुणीतरी चोरून पळवली तर अहमदभाईंच्या व्यक्तित्वाची शान निघून जाईल, इतकेच नव्हे, तर गावाचाही दिलदार रुबाब परागंदा होईल. अहमदभाईंचा पोशाखही तसाच त्या दाढीची कळा दरबारी करणारा. गोंडा असलेली उंच लाल टोपी, सोन्याच्या बारीक काड्यांचा चष्मा, गुडघ्यापर्यंत रुळणारा लांब काळा कोट, त्या कोटाची बटणेही सोन्याच्या मुलाम्याची. सफेद, शुभ्र सुरवार आणि रेशमी भरावाचे जोडे. हातात नेहमीच एक काळ्या पॉलिशची गुप्ती. वय पन्नाशीच्या पुढचे.

अहमदभाई बरीच वर्षे आफ्रिकेला होते. अलीकडच्या काही वर्षांत ते गावात आलेत. आपल्या जुन्या घरावर सुरेखशी माडी बांधून राहिलेत. या गृहस्थाला दोन गोष्टींचे तुफान वेड. एक गोष्ट, गुलाबांची बाग. त्यांनी घरावर माडी चढवण्याच्या अगोदर घरासमोरच्या मळ्यात हरतऱ्हेच्या गुलाबांची बाग उठवली. लाल, सफेद, पिवळे, वासाचे, बिनवासाचे, झुबकेदार अनेक जातींचे गुलाब त्यांनी आपल्या घरासमोर फुलवलेले

आहेत. सुंदर दाढी असलेल्या या माणसाला हे गुलाबांचे वेड शोभून दिसते. आणि दुसरी गोष्ट म्हणजे अत्तर. अहमदभाई सांगतील, ' ऐसी चीज सिर्फ मेरेही पास होती ' आणि मग ते आपल्या लांब कोटाच्या कुठल्यातरी खिशातून एखादी कुपी बाहेर काढतील, एकटक त्या लहानशा वस्तूकडे पाहत राहतील आणि कुपी खिशात ठेवून देतील. तुम्ही मनगट पुढे कराल कदाचित, पण ते म्हणतील, 'भाई, अत्तर कुपीतच ठेवावं. बाहेर पडलं की त्याची अब्रू जाते. हो हो, ......अब्रूही गेली पाहिजे; पण हे अत्तर फार अब्रूदार आहे. याची अब्रू जाऊन चालणार नाही. कारण तुम्हांस खोटं वाटेल; पण मी एकदा नेहरूंच्या मनगटाला अत्तर लावलंय. नका, संशय घेऊ नका, सच है. पण काय सांगू बेटा, माझं अत्तर फिकं पडलं. नेहरूंचं मनगटच माझ्या अत्तराहून खुशबूदार होतं.' ऐकणाऱ्याला ते कधीच खोटे वाटत नसे. नेहरूंना ज्या कुपीतले अत्तर त्यांनी लावलेय तीच ही कुपी.



पण एखादेवेळी हे अहमदभाई असा चमत्कारिकपणा करतात, की बोलून सोय नाही. गावातल्या कुठल्याही घरात अगदी प्रातःकाळी जातील आणि म्हणतील, ' सलाम सांगायला आलोय. ही गुलाबाची फुलं सगळ्या बायकांनी माळा आणि तुमच्या देवालाही घाला. खुदाला खूप आवडतील हो. या अत्तराच्या कुप्या घ्या. अंघोळीच्या पाण्यात अत्तर टाका. अत्तरानं अंघोळ

-आनंद करा!' अहमदभाई मग त्या घराला अगदी खूश करून चहा घेऊन निघून जातात.

गणेशचतुर्थीच्या दिवशी गावाला अहमदभाईंची गुलाबांची बाग खुली असते. कित्येकांच्या घरी अहमदभाई गुलाबांची फुले घेऊन स्वतः जातात आणि आपल्या नोकराला बजावून ठेवतात, 'गावातल्या प्रत्येक घरी आपल्या बागेतले गुलाब पोचले पाहिजेत. बाग खुदाची आहे.' अहमदभाई आपल्या गुलाबांच्या बागेत दिवसभर मग्न असतात. एखादे रोपटे एखाद्या दिवशी फुलले नाही तर ते सचिंत होतात. त्यांचा चेहरा त्या दिवशी उतरलेला असतो.

कुणाच्या घरी लग्नकार्य निघाले, की अहमदभाई सर्वांत पुढे हजर. ते वराला किंवा वधूला गुलाबांचा गुच्छ देऊन म्हणतात, ' बेटा! इसमें खुशबू है. याची कसम घेऊन सुखाचा संसार कर. बेटा, जोडीदाराला गुलाबाच्या फुलासारखा सांभाळ!' का कोण जाणे, गुलाबाचा गुच्छ वधूवरांच्या हाती देताना अहमदभाईंचे डोळे भरून येतात; पण त्या अश्रूंत आनंद असतो. दोन जिवांच्या नव्या संसाराबद्दल काही अपेक्षा असतात. हृदयात त्यांच्यासाठी आशीर्वाद भरून आलेला असतो.

कधी कधी अहमदभाई लगबगीने गावात येतात. कशासाठी? त्यांच्या रेडिओवर अब्दुल करीमखाँचे गायन लागलेले असते, ते इतरांनी ऐकावे हे सांगायला. गावातल्या लोकांनी, अर्थातच गाण्यातल्या काही दर्दी मंडळींनी ते गायन आपल्या रेडिओवर तोपर्यंत ऐकलेले असते. ते लोक भाईंना म्हणतात, ''अरे अहमदभाय, तू तुझ्या रेडिओवर स्वस्थपणे गाणं ऐकायचं सोडून आम्हांला मुद्दाम सांगायला का आलास? आम्ही ते ऐकणारच!'' त्यावर अहमदभाई म्हणतात, ''ठीक है! कदाचित तुम्ही ऐकायला विसराल म्हणून आलो सांगायला!''

**प्रश्न :**

अ. १. कोणत्या प्रकारच्या पोशाखामुळे अहमदभाई रुबाबदार दिसत?

२. अहमदभाई एखादेवेळी कोणता चमत्कारिकपणा करत?

३. एखाद्याच्या मनगटाला अहमदभाई अत्तर का लावत नसत?

४. अहमदभाईंना गुलाबफुलांचे वेड होते,हे पाठात कोठे कोठे दिसून येते?

५. अत्तराबाबत अहमदभाईंचे विचार कोणते?

आ. 'अब्रू' या नामापासून 'अब्रूदार' असे विशेषण तयार होते. यासारखी खालील नामांपासून विशेषणे तयार करा.

खुशबू, रुबाब, झुपका, डौल.

इ. तऱ्हेतऱ्हेचा, हरतऱ्हेचा, कित्येक, प्रत्येक या शब्दांचा अर्थ सांगून वाक्यांत उपयोग करा.

ई. संदर्भासह अर्थ स्पष्ट करा.

१. अत्तर कुपीतच ठेवावं. बाहेर पडलं की त्याची अब्रू जाते.

२. बेटा, जोडीदाराला गुलाबाच्या फुलासारखा सांभाळ!

३. नेहरूंचं मनगटच माझ्या अत्तराहून खुशबूदार होतं.

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. अहमदभाईंचे स्वभावचित्र रेखाटा.

२. तुमच्या गावातील किंवा परिचयातील अहमदभाईंसारख्या एखाद्या प्रेमळ व मनमिळाऊ व्यक्तीचे वर्णन करा.

**व्याकरण :**

आपल्या तोंडावाटे निघणारे जे मूलध्वनी, त्यांनाच **वर्ण** असे म्हणतात. उदा. अ, आ, क, ख, ग इत्यादी.

अ, आ, इ, ई पासून ओ, औ पर्यंतचे वर्ण उच्चारताना दुसऱ्या वर्णाचे साहाय्य घ्यावे लागत नाही. या वर्णांना **स्वर** असे म्हणतात.

क्, ख्, ग्, घ् पासून ह्, ळ् पर्यंतचे वर्ण स्वतंत्रपणे उच्चारता येत नाहीत. 'क' चा उच्चार करताना 'अ' या स्वराचे साहाय्य घ्यावे लागते. या वर्णांना **व्यंजने** असे म्हणतात.





# ४. गोकुळ

**राम गणेश गडकरी —** नाटककार, कवी व विनोदी लेखक म्हणून प्रसिद्ध. 'प्रेमसंन्यास', 'पुण्यप्रभाव', 'भावबंधन', 'एकच प्याला' ही यांची गाजलेली नाटके. किर्लोस्कर नाटक मंडळीत ते तालीम मास्तर होते; म्हणून यांना 'मास्तर' या नावानेही ओळखत. यांनी 'गोविंदाग्रज' हे टोपण नाव घेऊन कविता लिहिल्या, तर 'बाळकराम' या नावाने विनोदी लेख लिहिले.

गोकुळ हा त्यांच्या 'प्रेमसंन्यास' या नाटकातून घेतलेला एक प्रवेश आहे. स्वभावनिष्ठ आणि शब्दनिष्ठ विनोदाची उदाहरणे म्हणून यातील संभाषण महत्त्वाचे ठरते.

*(गोकुळचे घर. गोकुळ सचिंत उभा आहे.)*

**गोकुळ** : आता या विसराळूपणाला काय करावे! अगदी घटकेची सुद्धा आठवण राहत नाही! कोणकोणती कामे करायची आहेत त्यांची आठवण राहण्यासाठीं उपरण्याला या गाठी मारून ठेवल्या. पण आता कोणती गाठ कशासाठी हेच विसरलो. मला स्मरणशक्ती द्यायला ब्रम्हदेव अजिबात विसरला की काय? चांगला पोशाख घालून कुठे जायला निघालो तो कुठे जायचे याचाच विसर पडला! म्हणून तिला तरी विचारून पाहावे एवढ्यासाठी पुन्हा परतून आलो. बाकी ती सांगेल की नाही याचा संशयच आहे. हा विसराळूपणा आणि ही भांडखोर बायको या दोहोंनी माझ्या जन्माचे इथेच सार्थक झाले आहे. कोणतीही गोष्ट विसरायचे मी विसरत नाही! आणि कोणती गोष्ट विसरल्याबद्दल रागवायचे, ती विसरत नाही! वाहवा! गोकुळ, धन्य तुझा संसार! पण अशा

विचारात वेळ घालवून उपयोग नाही. नाहीतर पुन्हा घरी कशासाठी आलो याचाच विसर पडेल! त्याची आठवण आहे तोच तिला हाक मारावी! अगं ऐकलेस का? जरा इकडे ये पाहू. ऐकलेस का? ए!

*(पडद्यात मथुरा ओरडते, 'ऐकले हो. आले, जरा थांबा.')*

**गोकुळ** : आता हाका मारण्याचा सपाटा सुरू ठेवावा, नाहीतर थोडा उशीर झाला म्हणजे तिला कदाचित येथे येण्याची आठवण राहणार नाही. आलीस का? अगं ए, ऐकलेस का? अगं ए —

*(मथुरा हात पुशीत बाहेर येते.)*

**मथुरा** : झाले काय एकसारखे ओरडायला! जरा हात धूत होते, तर पन्नास हाका झाल्या. वाघ का पाठीस लागला आहे तुमच्या?

**गोकुळ** : तशातला काही प्रकार नाही! तू अशी सदा हात धुऊन पाठीस लागल्यावर वाघाला सवड कोठून मिळणार? म्हटले, कामामुळे पहिल्या हाकेची तुला आठवण राहणार नाही —

**मथुरा** : न राहायला काय झाले आहे मला? आपल्यासारखेच का जग आहे सारे?

**गोकुळ** : बरे, ते असो. काय विचारणार होतो मी तुला? — पाहिलेस, हे असे होते.

**मथुरा** : काय हे? आपल्याला आपल्या नावाचा विसर कसा पडत नाही याचे —

**गोकुळ** : तू माझ्या नावाने नेहमी खडे फोडीत राहिली नसतीस, तर खात्रीने मी नावसुद्‌धा विसरलो असतो. आठवण म्हणून कशी ती राहत नाही!

**मथुरा** : आठवण राहत नाही तर उपरण्याला खूणगाठ बांधावी एखादी.

**गोकुळ** : ही बघितलीस खूणगाठीच्या फुग्यांनी उपरण्याची कशी सूतपुतळी झाली आहे ती!

मथुरा : हे काय? माझी आपली गाठ पडली आहे म्हणूनच आपली अब्रू ठिकाणावर आहे. इतक्या का गाठी देतात कुठे? करायचे ते भारीच! आता देशमुखांच्या येथे चार माणसे जमणार आणि तेथे असे सोंगासारखे —

गोकुळ : शाबास, हेच विचारणार होतो! देशमुखांकडे जायला निघालो होतो हेच वाटेत विसरलो!

*(एक गाठ सोडतो.)*

मथुरा : बरे, मघाशी ते सामान आणायला सांगितले त्याचे काय झाले?

गोकुळ : काय व्हायचे? हेच झाले! वाण्याच्या दुकानापर्यंत गेलो आणि काय आणायचे ते विसरलो!

मथुरा : बाई, बाई, बाई, हद्द झाली आता! शेरभर साखर आणि तोळाभर केशर एवढेसुद्धा विसरला ना?

गोकुळ : जिनसा लक्षात होत्या, पण शेरभर साखर आणि तोळाभर केशर,



की तोळाभर साखर आणि शेरभर केशर ह्याचा निर्णय होईना, तेव्हा टाकले ते उद्यावर काम.

**मथुरा** : ते नाही चालायचे. आधी सामान आणा नाहीतर आज चूल बंद! रात्री जेवायला काही मिळायचे नाही.

**गोकुळ** : बरी आठवण केलीस! मला आज देशमुखांकडे पाहुण्यांच्या पंक्तीला बसायचे आहे हे मी विसरलोच होतो! आता तुला वाटले तर ठेव चूल बंद!

**मथुरा** : मी म्हणते, सामान आधी आलेच पाहिजे! मग जायचे होते कोठे भीक मागायला. आणखी ऊठपाय देशमुखांकडे काय असते हो तुमचे?

**गोकुळ** : काय असते म्हणजे? आज लहानपणापासून त्यांनी मला वाढवले, लिहायला वाचायला शिकवले, संसार थाटून दिला आणि म्हणे तिथे काय असते? मोठी शहाणीच की नाही तू?



घरात काय वाटेल ते कर! आज तिकडे पाहुणे येणार, चार माणसे जमणार, आणि मी गेलो नाही तर —

**मथुरा** : तर, तर, अडून बसेल त्यांचे अगदी! हे पाहा, तुम्हांला जर माझा छळ करायचा असेल तर मी जाते आपली माहेरी. माझ्या बापाच्या येथे अन्नवस्त्राला काही तोटा नाही.

**गोकुळ** : वाः! तुझा बाप म्हणजे हजारांचा पोशिंदाच की नाही! त्याच्या खाणावळीत रोज दोनशे पान जेवून उठते. तेव्हा अन्नाला काही तोटा नाही खरा! पण सात रुपये महिना तू कोठून देणार?

**मथुरा** : इतके हिणवायला नको काही, माझी आई खंबीर आहे मला पोसायला! म्हशीची शिंगे म्हशीला काही जड होत नाहीत!

**गोकुळ** : मग लग्नाची तरी उठाठेव कशाला केली? म्हणजे त्या म्हशीची शिंगे माझ्या डोक्यावर तरी बसली नसती.

**मथुरा** : लग्न तरी कुठे करणार होते माझे! पण हळदकुंकवाला आधार म्हणून —

**गोकुळ** : म्हणून माझ्या गळ्यात तुझ्या माळेची तांत बांधली वाटते? म्हणे मी त्यांना जड नाही! इतका उदार तुझा बाप असता तर मग दिवाळसणासाठी तुला न् मला महिनाभर ठेवून घेऊन अखेर नऊ रुपये दरमहाप्रमाणे दोघांचा अठरा रुपये आकार का केला असता माझ्यावर? त्याने केला दिवाळसण, पण माझे निघाले दिवाळे!

**मथुरा** : आपल्यासारख्या दिवाळखोराला असेच पाहिजे. एरवी मी एकटी गेले म्हणजे माझा मानपानसुद्‌धा ठेवतात सारी माणसे! इतकी माणसे असतात आमच्या बाबांच्या खाणावळीत; पण माझ्याखेरीज पान हालत नाही.

**गोकुळ** : खरेच पान हालत नसेल! खाणावळीतली दोनदोनशे पाने हालवायला तुझ्यासारखी खंबीर बायकोच पाहिजे. आणि याच

गुणामुळे मात्र तुझा बाप अन्न तर देईलच, पण तुझ्या गुणावर पांघरूणसुद्धा घालील!

**प्रश्न :**

**अ.** १. गोकुळने मथुरेस हाका मारण्याचा सपाटा का सुरू ठेवला?

२. मथुरा उपरण्यास खूणगाठ बांधायचे का सुचवते?

३. गोकुळ कोणकोणत्या गोष्टी विसरतो?

४. दिवाळसणाबद्दल गोकुळ काय काय म्हणाला?

५. विसरभोळा गोकुळ कोणती गोष्ट विसरत नाही?

**आ.** पान हालणे आणि पान हालवणे, दिवाळसण करणे आणि दिवाळे निघणे या शब्दांच्या जोड्यांतील अर्थांचा फरक सांगून त्यांचा स्वतःच्या वाक्यांत उपयोग करा.

**इ.** ही, काय, जी, आम्ही या सर्वनामांचा वाक्यांत उपयोग करा.

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. गोकुळच्या विसराळूपणाचे तीन नमुने तुमच्या शब्दांत लिहा.

२. तुमच्या जीवनातील विसराळूपणाचा एक रम्य अनुभव लिहा.

३. हा नाट्यप्रवेश शाळेच्या स्नेहसंमेलनात सादर करा.

**व्याकरण :**

स्वर हे पूर्ण उच्चाराचे वर्ण आहेत, तर व्यंजने हे अपूर्ण उच्चाराचे वर्ण आहेत. व्यंजने ही अपूर्ण उच्चाराची आहेत हे दाखवण्यासाठी त्यांचा पाय किंचित मोडून लिहिण्याची पद्धत आहे;परंतु व्यवहारात त्यांचा उच्चार करताना स्वर मिळवूनच करतात, म्हणून मूळ वर्ण लिहिताना आपण नेहमीच व्यंजनाचा पाय मोडून न लिहिता ती व्यंजने क, ख, ग, घ....ह, ळ अशा पद्धतीने लिहितो.



# ५. पावसाळा आला

**चिं. वि. जोशी (चिंतामण विनायक जोशी)** — विनोदी लेखक म्हणून सर्वत्र परिचित. यांनी मुलांसाठी देखील लिखाण केलेले आहे. कादंबरी आणि चरित्रलेखनही यांनी केले. 'एरंडाचे गुऱ्हाळ', 'चिमणरावांचे चऱ्हाट', 'वायफळाचा मळा' इत्यादी पुस्तकांतून चिमणराव आणि गुंड्याभाऊ या दोन विनोदी व्यक्ती यांनी वाङ्मयात लोकप्रिय केल्या. यांच्या विनोदात कठोरता नाही. प्रखर हल्ला करणे किंवा कडकडून चावा घेणे नाही, तर व्यक्तीच्या, रूढीच्या, परंपरेच्या किंवा सामाजिक अव्यवस्थेच्या अनिष्ट अंगांवर शस्त्रक्रिया करण्याचे कौशल्य त्यांच्या लेखनातून दिसून येते. पाली भाषेचे तज्ज्ञ. बौद्ध धर्मविषयी यांनी जाणीवपूर्वक लेखन केलेले आहे.

या पाठात पावसाळ्यात सामान्य माणसाची छत्रीमुळे उडणारी त्रेधातिरपीट वर्णन करतानाच छत्री ही कोणकोणत्या प्रकारे उपलब्ध होते आणि तिची सार्वत्रिक देवाणघेवाण आपल्या कशी अनुभवाला येते, याचे विनोदी वर्णन लेखकाने केलेले आहे. हा पाठ 'वायफळाचा मळा' या पुस्तकातून घेतला आहे.

पावसाळा म्हटला, की कित्येक नवीन खर्चाच्या गोष्टी भेडसावू लागतात. वहाणा, छत्र्या आणि पावसाळी कोट या त्या गोष्टी होत. वहाणा या शब्दाने, चेपल्या, पायताणे या सर्वांचा निर्देश करून या क्षणभंगुर, विश्वासघातकी आणि खर्चाळू पादत्राणांविषयी चार शब्द लिहितो. 'पायातील वहाण पायात असू द्यावी' हीच म्हण प्रचारात का आली? 'पायातला जोडा पायात असू द्यावा' अशी का आली नाही? जोड्याने कधीही रस्त्यात चालताना दगा दिला आहे, असे उदाहरण दिसले नाही. वहाणांचे मात्र बंद किंवा अंगठे ऐनवेळी तुटून फजिती होते आणि त्या उचलून घेतल्याशिवाय गत्यंतर राहत नाही.

एकदा आमच्या मित्राने अगदी अत्याधुनिक सफेद पट्ट्याच्या नवीन वहाणा खरेदी केल्या होत्या. दुसऱ्या दिवशी त्यास मालतीताईंकडे चहास जायचे होते. मालतीचा बंगला दूर होता आणि जवळ सायकल नसल्याने तो

पायीच जाणार होता. अर्ध्या वाटेत गेल्यावर डाव्या वहाणेचा बंद तुटला. जुन्या पद्धतीच्या वहाणांचे बंद तुटले तर अंगठ्याच्या आधाराने तरी चालता येते, पण नवीन चपलांना ही सोय नसते. वहाणा दुरुस्त करून घेण्यास गावाबाहेर काहीच साधन नव्हते. बरे, त्या फेकून द्याव्यात, तर पैसे फुकट गेले असते. शेवटी त्याने एक युक्ती काढली. छत्री उघडून तिच्या काड्यांच्या वर त्या अलगद ठेवून दिल्या. अनवाणी चालण्यास काही कारण पाहिजे होते. तेव्हा त्याने खिशातून हातरुमाल काढून तो पावलाभोवती बांधला, म्हणजे पाहणारास वाटावे, याच्या पायास काही इजा झाली आहे म्हणून हा अनवाणी चालत असावा.

दोन्ही युक्त्या अमलात आणून तो पुढे चालू लागला. मालतीचा बंगला जवळ आला तोच पावसाचे थेंब पडू लागले आणि मालतीही बंगल्याकडे जाताना पाठमोरी दिसली. तिच्याजवळ छत्री नव्हती अन् पाऊस तर जोरात सुरू झाला होता. दोन-चार उड्या मारून त्याने मालतीस गाठले व म्हटले, ''मालतीताई, छत्री हवी का?''

तिने 'होय' म्हणून त्याच्या हातची छत्री घेतली व स्वतःच्या डोक्यावर धरली. पण छत्रीच्या काड्यांवरती चिखल माखलेल्या चपला असल्याने ती फार जड वाटू लागली. ''माधवभाऊ, किती रे तुझी छत्री जड लागते आहे!'' ती म्हणाली.

तो म्हणाला, ''भिजल्यामुळे जड वाटत असेल.''

''ही छत्री म्हणजे दहा शेर वजनाचं ओझंच आहे!'' असे मालतीने बोलायला आणि चपलातल्या चिखलाची एक खपली तिच्या केसांवर पडायला एकच वेळ आली.

''मी धरू का ती?'' माधवने विचारले. आणखी एक खपली पडली.

''राहू दे... पण... अगबाई. हे माझ्या डोक्यात काय पडत आहे सारखं!'' मालतीने केस चाचपून पाहिले तो त्यात चिखलाच्या खपल्या! या कोठून पडतात म्हणून ती वर पाहू लागली, तो तिच्या हालचालींमुळे एक चप्पल



टपकन तिच्या डोक्यावर पडली. छत्री फेकून देऊन ती क्रोधाने माधवकडे पाहू लागली. माधव गोठू लागला. दोन्ही चपला रस्त्यात फेकून देऊन तो रडक्या चेहऱ्याने परत गेला. पुन्हा कधीही त्याने चपला वापरल्या नाहीत.

नाहीतरी छत्री हे एक पावसाळ्याबरोबर येणारे संकटच आहे. विसराळू लोकांना नेहमी छत्री विकत घ्यावी लागते. बाहेर पाऊस पडत असला तरच यांना छत्रीची आठवण होते, नाहीतर स्नेहयांच्या घरी, हॉटेलात, नाटक-सिनेमागृहात, आगगाडीत जेथे ते जातील तेथे छत्री विसरतात. असल्या विसराळूंचा स्नेह आपण जरूर करावा म्हणजे त्यांच्या विसरलेल्या छत्र्यांवर आपल्याला गुजराण करता येईल. छत्री वापरून खराब झाली व टाकून द्यावी लागली अशी गोष्ट स्वतः विकत घेतलेल्या छत्रीच्या बाबतीत कोणासही प्रामाणिकपणे करता येणार नाही.

पेन्सिल लिहून लिहून झिजली व संपली, स्वतः विकत आणलेले पुस्तक वाचून वाचून फाटून गेले, फौंटनपेन लिहून लिहून खराब झाले, या गोष्टी जशा अशक्य तशी छत्री वापरून वापरून खराब होणे अशक्यच असते. या जिनसा विसरून कोठेतरी राहिल्याने किंवा दुसऱ्याने लांबवल्याने किंवा दुसऱ्यास उसन्या दिल्यानेच आपल्याजवळून नाहीशा व्हायच्या असतात. आपल्याजवळ या येण्यालाही हा मार्ग खुला असतो, ही त्यातल्या त्यात समाधानाची बाब आहे.

आता या नियमास अपवादही आहेत. माझी छत्री पाहिलीत का? ही सात वर्षे झाली मजजवळ आहे. मजकडे येण्याच्या पूर्वी ती जुन्या मालकाजवळ एखादे वर्ष तरी असेलच. माझ्या ताब्यात आल्यानंतर एक वर्षाने मी तिची मूठ नवीन बसवून घेतली. दोन वर्षांनी कापड नवे बसवून घेतले. चौथ्या वर्षी काड्या नवीन बसवल्या. पाचव्या वर्षी दांडी बदलून घेतली! मग एका वर्षाने असे झाले, की मी मोटारने साताऱ्यास गेलो होतो, तेव्हा एका सहप्रवाशाची व माझी अशा दोन्ही छत्र्या टपावर ठेवल्या होत्या. उतरताना अंधार झालेला होता व सहप्रवाशाची दृष्टी फारशी तीक्ष्ण नव्हती. तेव्हा आमची अंतर्बाह्य सुधारणा केलेली छत्री त्याच्या हातात गेली आणि त्याची कोरी छत्री माझ्या हातात आली. या अदलाबदलीला वर्ष होत आले. सारांश, मी छत्री या विषयावर चार शब्द लिहीत आहे ते अधिकारयुक्त आहेत, अशी वाचकांनी खात्री बाळगावी.

आपण छत्री घेऊन पावसात चालत असलो आणि आपला बिनछत्रीवाला मित्र आपल्या आश्रयाला आला तर आपण दोघेही भिजून जातो. अशा वेळी आणखी एखाद्या मनुष्यास दयाळूपणाने आपल्या दुसऱ्या बाजूने चालण्यास बोलवावे. म्हणजे आपण कोरडे राहू व दोन बाजूचे मित्र मात्र पागोळ्यांखाली भिजत राहतील. शिवाय दुसऱ्यांदा बोलावलेला आपला आभारी होईल ते वेगळेच. ही युक्ती साफ व्यावहारिक असून सामान्येतर प्रसंगी वापरायची नाही हे सांगावयास नकोच.

रेनकोट हा एक पावसाळ्याबरोबर येणारा निरुपयोगी पाहुणा आहे आणि तो घेतला, की खांद्यावर टाकून बिचारा 'रेनकोट्या' दिवसभर चातकापेक्षा अधिक हावरेपणाने पावसाची वाट पाहत गावभर घिरट्या घालत असतो, परंतु मेघराजाच्या कठोर अंतःकरणाला पाझर फुटत नाही. शेवटी पाय दुखू लागले, म्हणजे 'रेनकोट्या' आपल्या मित्राच्या घरी जरा टेकण्यास जातो. तो मित्राघरी जाऊन बसण्याचा अवकाश, की पाऊस सुरू झालाच म्हणून समजावे. पाऊस पाहून 'रेनकोट्या' अंगात रेनकोट चढवून मित्राचा निरोप घेऊ लागतो.

मित्र — अरे थांब रे जरा, पावसाची सर जाऊ दे.

रेनकोट्या — अरे, मला आता पावसाचं काय? हा बघ ना, नवीन रेनकोट मुंबईहून आणला आहे.

मित्र — जाशील रे, आईनं तुला चहा ठेवला आहे. तेवढा तर घेऊन जाशील!

चहा तयार होऊन त्याचे प्राशन होते आणि रेनकोट्यास बाहेर जाण्याची संधी मिळण्याच्या आत पाऊस बंद झालेला असतो. अशा तऱ्हेने रेनकोटाचे ओझे वाहून, थकून गेल्यावर 'रेनकोट्या' आपला रेनकोट घरीच ठेवून फिरावयास गेला, की जोराचा पाऊस आलाच म्हणून समजावे!

प्रश्न :

अ. १. पावसाळ्यात चालताना वहाणेचा बंद तुटल्याने लेखकाच्या मित्रास कोणत्या दोन युक्त्या कराव्या लागल्या?
२. माधवकडून छत्री घेतल्यावर मालतीला कोणता त्रास झाला?
३. 'छत्री' या विषयावर माझे लिहिणे अधिकारयुक्त आहे असे लेखक का म्हणतो?
४. पाऊस व रेनकोट यांची शिवाशिवी कशी वर्णिली आहे?

आ. खालील शब्दसमूहाबद्दल एक शब्द लिहा.
१. काही क्षणांतच नाश पावणारी गोष्ट —

२. पायाच्या रक्षणासाठी घालायचे साधन —
३. पावसापासून रक्षणासाठी वापरायचा कोट —
४. वेगवेगळ्या विषयांत संशोधन करणारा —
५. केलेले उपकार जाणणारा —

इ. 'अधुना' या शब्दापासून 'आधुनिक' असा शब्द तयार झाला आहे. या शब्दाप्रमाणे खालील शब्दांना 'इक' प्रत्यय लावून रूपे तयार करा.
समाज, समुदाय, व्यवसाय, व्यवहार.

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालीलपैकी एका विषयावर निबंध लिहा.
(अ) पहिल्या पावसात भिजण्याचा आनंद
(ब) पावसामुळे निसर्गात होणारे बदल
(क) पाऊस पडला नाही तर.........!

२. 'पाऊस' या विषयावर असलेल्या कविता जमवा.

**व्याकरण :**

मराठीत अनुस्वार व विसर्ग असे दोन उच्चार आहेत. त्यांच्या खुणा पुढीलप्रमाणे :
अनुस्वार (ं), विसर्ग ( : )

अनुस्वार आणि विसर्ग यांचा उच्चार स्वतंत्रपणे करता येत नाही, म्हणून ते स्वर नाहीत. यांचा उच्चार करताना व्यंजनाप्रमाणे, स्वरांचे साहाय्य घ्यावे लागत नाही; म्हणून त्यांना व्यंजने म्हणता येत नाहीत.

उदा.: कंकण, चिंच (अनुस्वार)
- उषःकाल, दुःख (विसर्ग)

अनुस्वार व विसर्ग या दोन ध्वनींच्या किंवा वर्णांच्या पूर्वी स्वर येतो; म्हणून यांना **स्वरादी** असे म्हणतात.





# ६. देवगुणी लक्ष्मी

**ह. कि. तोडमल —** हे नगरचे. यांचे बरेच स्फुट लेख असून यांची 'अर्वाचीन मराठीतील खंडकाव्ये' व 'महर्षी शिंदे', 'कर्मवीर भाऊराव पाटील' ही पुस्तके प्रकाशित झाली आहेत. हा पाठ यांच्या 'कर्मवीर भाऊराव पाटील' या पुस्तकातून घेतला आहे.

कर्मवीर भाऊराव पाटील यांनी शिक्षणाच्या क्षेत्रात महान कामगिरी केली. भाऊराव पाटलांच्या पत्नी सौ. लक्ष्मीबाई यांचा त्या कामात सिंहाचा वाटा होता. त्यांचे हृदय चित्र येथे रेखाटले आहे.

भाऊरावांनी सातारला शाहू बोर्डिंग सुरू केले. शाहू बोर्डिंगमधील बहुतेक मुले गरीब घरची होती. त्यांना भाऊरावांनीच सातारा जिल्ह्यातून गोळा केले होते. ज्या थोड्या विद्यार्थ्यांच्या घरची आर्थिक स्थिती बरी होती, त्यांच्या पालकांकडून भाऊराव खर्चासाठी पैसे घेत असत. बहुसंख्य विद्यार्थी नादार व अर्धनादार म्हणूनच बोर्डिंगमध्ये घेतलेले असत. घरातील मुलांसाठी आईबाप जे जे करतात, ते ते सर्व भाऊराव आणि लक्ष्मीबाई या मुलांसाठी करत असत. मुलांचे पालक परगावी असायचे. त्यांना शिक्षणदृष्टी नसायची. त्या मुलांची ही उणीव भाऊराव आणि लक्ष्मीबाई भरून काढत असत. त्या सर्वांमध्ये एक कौटुंबिक नाते निर्माण झाले होते.

बोर्डिंगमधील मुलांचा सारा आर्थिक व्यवहार मुलांतून निवडलेल्या विद्यार्थ्यांच्या हस्ते होत असे. प्रत्येक मुलाचा हिशेब टिपलेला असायचा. बोर्डिंगचा जमाखर्च काटेकोरपणे ठेवला जात असे. बागेत पिकलेला काही माल बाजारात विकला जायचा. त्याचा जमाखर्चही व्यवस्थित ठेवला जायचा. भाऊराव बोर्डिंगसाठी देणग्या गोळा करत असत. त्यासाठी त्यांना नेहमी परगावी प्रवास करावा लागे. पण प्रवासाहून परतताच पैन्‌पैचा हिशेब ते



विद्यार्थी-सेक्रेटरीजवळ देत असत. मुलांच्या राहण्या-जेवणाचा खर्च भागवताना भाऊराव नेहमी मेटाकुटीला येत असत. त्यांच्यापुढे अनेकदा आर्थिक अडचणी उभ्या राहत. अशावेळी भाऊराव लक्ष्मीबाईंशी जास्तच गोडीगुलाबीने वागायचे. लक्ष्मीबाई भाऊरावांचा कावा ओळखायच्या. मग भाऊराव लक्ष्मीबाईंजवळ एखाद्या सोन्याच्या दागिन्याची मागणी करत. असा लक्ष्मीबाईंचा एकेक दागिना बोर्डिंगसाठी खर्ची पडला.

एकदा सोलापूरहून लक्ष्मीबाईंचे बंधू कलगोंडा अण्णाराव पाटील बहिणीला भेटायला म्हणून आले होते. त्यांना बहिणीच्या अंगावर एकही दागिना दिसेना. त्यांनी त्याविषयी बहिणीकडे व भाऊरावांकडे चौकशी केली. त्यांना दागिन्यांची खरी हकिगत कळली, तेव्हा त्यांनी कळवळून उद्‌गार काढले, ''आम्ही लक्ष्मीला लग्नात सोन्याच्या दागिन्यांनी मढवून सासरी धाडले; पण आता माझ्या बहिणीला, भाऊराव तुम्ही लंकेची पार्वती करून टाकली आहे!''

एका संक्रांतीच्या सणाला भाऊराव सातारला नव्हते. बोर्डिंगच्या तिजोरीत धान्यखरेदीसाठी पुरेसे पैसे नव्हते. सेक्रेटरी अप्पालाल लक्ष्मीबाईंकडे आला. "उद्या संक्रांतीचा सण आहे, आज धान्य खरेदी करून दळून आणावे लागेल. त्यासाठी पुरेसे पैसे नाहीत. दुकानदारास आधीची उधारी देणे आहे. मागील उधारी चुकती केल्याशिवाय तो आता नवीन खरेदी करू देत नाही आणि भाऊराव तर नाहीत. मी काय करू?" लक्ष्मीबाईंनी गळ्यातील मंगळसूत्र काढले आणि सेक्रेटरीच्या हातात ठेवले व म्हणाल्या, "हे मंगळसूत्र गहाण ठेव. पैसे घे आणि सणासाठी लागणाऱ्या सर्व वस्तू खरेदी कर. ते आले म्हणजे मग मंगळसूत्र सोडवून आणतील." सेक्रेटरी चक्रावून गेला. पण त्याच्यापुढे अन्य मार्ग नव्हता. त्याने तो सौभाग्यालंकार गहाण ठेवला व त्या पैशाने दुसऱ्या दिवशी मुलांचा संक्रांतीचा सण साजरा केला.

लक्ष्मीबाईंची छोटी मुलगी बेबी नेहमी मुलांमध्ये खेळायला जाई. मुले जेवायला बसली, की बेबी त्यांच्या ताटात जेवायला बसे. कधीमधी जेवताना हातात भाकरीचा तुकडा घेऊन थेट लक्ष्मीबाईंकडे स्वयंपाकघरात येऊन ती चिकटत असे. बेबीने लक्ष्मीबाईंचे सोवळे धुडकावून लावले. सोवळ्यापेक्षाही लक्ष्मीबाईंचे मुलांवरील प्रेम अधिक दृढ होते.

एकदा लक्ष्मीबाईंची दाढ फार दुखू लागली. सातारला उपाय होण्याची शक्यता नव्हती. लक्ष्मीबाई बोर्डिंगचा सेक्रेटरी अप्पालाल शेखबरोबर पुण्याला गेल्या. एका परिचिताकडे उतरल्या. त्या सायंकाळी लक्ष्मीबाईंना फणफणून ताप भरला व दाढ खूपच ठणकू लागली. त्यांना स्वतःच्या हाताने स्वयंपाक करता येणे शक्य नव्हते. बरोबर शिधा आणलेला होता. अप्पालालने लक्ष्मीबाईंना विचारले, "वहिनी, मी पिठले-भात शिजवू का? माझ्या हातचा तुम्हांला चालेल का?" लक्ष्मीबाईंनी संमती दिली. अप्पालालने आनंदाने पिठले-भात केला. लक्ष्मीबाईंनी आपल्या बोर्डिंगमधील या मुसलमान मुलाच्या हातचे अन्न, नव्हे जणू आपल्याच मुलाच्या हातचे अन्न, म्हणून आनंदाने घेतले.

एकदा असेच भाऊराव साताऱ्याला नव्हते. कोणी एक पाहुणे बोर्डिंग पाहायला आले. बोर्डिंगजवळच लक्ष्मीबाई राहत होत्या. त्यांच्याजवळ पाहुण्यांनी बोर्डिंगची चौकशी केली. नंतर पाहुण्यांनी लक्ष्मीबाईंना विचारले, ''बाई, तुम्हांला मुलं किती?'' लक्ष्मीबाईंनी उत्तर दिले, ''ही काय, बोर्डिंगमधील ही सारी मुलं माझीच आहेत.'' बाईंच्या या भावभरित उद्गाराने पाहुणा भारावून गेला. त्याने लक्ष्मीबाईंना धन्यवाद दिले.

लक्ष्मीबाईंनी मुलांसाठी नुसते दागिने व स्वतःचे सौभाग्यालंकारच दिले नाहीत, तर खरीखुरी आईची माया दिली. लक्ष्मीबाई स्वभावाने सात्त्विक व वर्तनाने फार सौम्य होत्या. प्रसंगी भाऊराव मुलांच्या हातून चुका झाल्यावर



खूप संताप करायचे, मुलांना रागे भरायचे. पण लक्ष्मीबाई मुलांवर कधी रागवत नसत, उलट त्या चुका करणाऱ्या मुलांना नीट समजून घेत व मायेचा आधार देऊन त्यांचे कुठे चुकते हे समजावून सांगत.

एकदा बोर्डिंगचा सेक्रेटरी व गनी आत्तार या विद्यार्थ्यांमध्ये कलह झाला. सार्वजनिक वर्गणी दरमहा गोळा करण्याचे काम गनी आत्तारने स्वीकारलेले होते. ते काम आणि आत्तारची स्वयंपाकाची पाळी एकाच दिवशी आली. आत्तारने वर्गणीचे काम केले व स्वयंपाकाच्या कामाला तो विनापरवाना गैरहजर राहिला. सेक्रेटरीने गनीचे जेवण बंद केले. गनी सेक्रेटरीशी भांडला तरीही सेक्रेटरी काही बधला नाही. उलट बेशिस्त वागून भांडण केले म्हणून गनीला त्याने बोर्डिंगमधून काढून टाकण्याची धमकी दिली. गनीकडे एक पावली होती. रागाच्या भरात त्याने काय आणले आणि खाल्ले, कोण जाणे! त्याला गुंगी आली व तो बेशुद्‌ध पडला. मुलांनी गनीच्या तोंडावर पाणी मारले, त्याला हालवले, तरी त्याची बेशुद्‌धी जाईना. मग मुले घाबरली. त्यांनी लक्ष्मीबाईंना बोलावले. लक्ष्मीबाईंनी गनीला प्रेमाने हाका मारल्या. गनी जगतो की मरतो अशी भीती लक्ष्मीबाईंना वाटली. त्यांच्या डोळ्यांतून टिपे गळू लागली.

गनी आत्तारचे बरेवाईट होऊ नये म्हणून लक्ष्मीबाईंनी त्याला त्वरेने सरकारी इस्पितळात दाखल केले व औषधोपचार त्वरित करवले. पुढे गनी आत्तार बरा झाला. बरे झाल्यावर गनी आत्तार लक्ष्मीबाईंच्या जवळ येऊन रडू लागला. त्याला बोर्डिंगमधून काढून टाकण्याची भीती वाटत होती. त्या वेळी लक्ष्मीबाईंनी आत्तारला धीर दिला. भाऊराव आल्यावर त्याची बाजू लक्ष्मीबाईंनी समजावून सांगितली. त्याची चुकी माफ करवली. गनी आत्तारला आई नव्हती. आईविना पोरका झालेला आत्तार लहानपणी त्याच्या आत्येने वाढवला. आत्तार आईच्या मायेला पारखा झालेला होता. ती माया त्याला बोर्डिंगमध्ये लक्ष्मीबाईंकडून मिळाली.

लक्ष्मीबाईंनी मंगळसूत्र गहाण ठेवून मुलांचा सण साजरा केल्याचे जेव्हा

भाऊरावांना कळले तेव्हा त्यांना धन्य वाटले. अशी देवगुणी लक्ष्मी स्वतःला पत्नी लाभली म्हणून भाऊराव कृतकृत्य झाले.

**प्रश्न :**

अ. १. लक्ष्मीबाईंनी वसतिगृहातील मुलांच्या पालकांची भूमिका कोणत्या प्रकारे पार पाडली?

२. लक्ष्मीबाईंना देवगुणी लक्ष्मी का म्हटले आहे?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. मेटाकुटीला येणे, कावा ओळखणे, लंकेची पार्वती करणे या वाक्प्रचारांचा अर्थ सांगून वाक्यात उपयोग करा.

२. पाठातील मजकुराच्या आधारे 'देवगुणी लक्ष्मी'चे व्यक्तिचित्र थोडक्यात रेखाटा.

३. लक्ष्मीबाईंनी बोर्डिंगमधील मुलांवर अतोनात प्रेम केले हे सिद्ध करणारा एक ठळक प्रसंग तुमच्या शब्दांत लिहा.

४. एखाद्या सेवाभावी संस्थेच्या विद्यार्थी वसतिगृहाला भेट द्या. तेथील विद्यार्थ्यांच्या दिनचर्येची माहिती मिळवा.

५. ए. के. घोरपडे यांचे 'कर्मवीर भाऊराव पाटील' हे पुस्तक मिळवून वाचा.

**व्याकरण :**

हे माझे पुस्तक आहे. ते टेबलावरचे रमेशचे आहे.

एखादी वस्तू जवळ असेल तर आपण लिंगभेदासाठी हा, ही, हे,ह्या ही सर्वनामे वापरतो, पण तीच वस्तू दूर असेल तर तो, ती, ते, त्या ही सर्वनामे वापरतो. ही सर्वनामे वापरताना आपण त्या वस्तू व त्यांचे अंतर दर्शवितो किंवा दाखवतो, म्हणून त्यांना **दर्शक सर्वनामे** असे म्हणतात.

खालील वाक्यांतील दर्शक सर्वनामे ओळखा.

१. जा, हे मंगळसूत्र गहाण ठेव. ते आले म्हणजे मग मंगळसूत्र सोडवून आणतील.

२. बोर्डिंगमध्ये कधी कोणी आजारी पडल्यास त्या मुलाची लक्ष्मीबाई आईच्या मायेने विचारपूस करीत.





# ७. घर

**मो. दा. देशमुख (मोरेश्वर दामोदर देशमुख)** — नाट्य व लघुकथा या क्षेत्रांत लेखन. यांचे 'देव नाही देव्हाऱ्यात' हे नाटक मराठी रंगभूमीवर गाजले. यांनी बालवाङ्मयदेखील निर्मिले आहे.

घरगुती सुखदुःखाचे हृदयस्पर्शी दर्शन मो. दा. देशमुख यांच्या 'घर' या कथेतून घडते. घर म्हणजे केवळ चार भिंती नव्हेत किंवा ती एखादी निर्जीव वास्तूदेखील नव्हे. ती कुटुंबाचाच एक भाग झालेली असते. कुटुंबाच्या सुखदुःखांची ती साक्षीदार असते. त्यामुळे ती सोडताना भावबंध तुटतात आणि जीव व्याकूळ होतो, हे जुन्या पिढीतील व्यक्तींचे दुःख या कथेत प्रभावीपणे चित्रित केलेले आहे.

आम्ही सारी रात्रीची माजघरात जेवायला बसलो होतो. मात्र घरात रोजच्यासारखं वातावरण नव्हतं. नानाजी रोज जेवताना मोठ्या काकाजींशी बोलायचे. कचेरी, तारखा, केस, घर, सौदा, वकील असले शब्द असलेल्या गोष्टी करायचे. त्या गोष्टी आज बंद होत्या.

आम्हा मुलांना अशी मुकाट्यानं जेवण्याची सवय नव्हती. आम्ही सारी जेवायला बसलो, की घर कसं गर्जून उठायचं. मोठ्या काकाजींबरोबर आम्ही जेवणाच्या सुरवातीला 'वदनी कवळ घेता...' म्हणू लागलो, की धाकटी काकी कान झाकून घ्यायची आणि दादीमाय म्हणायची, ' माहं घर कसं भरलं गोकुळ आहे.'

आम्हां मुलांत मोठ्या काकाजींचा परशुराम जरा मोठा होता. त्याला कशा कोण जाणे, पण मोठ्या माणसांच्या साऱ्या गोष्टी कळायच्या. त्याला मी खुणावून आज असं का म्हणून विचारलं. तो 'च'च्या भाषेतच म्हणाला,

"चलातु चकए चष्टगो चवूकठा चहेकाआ?"

''चणतीको चष्टगो!''

''चपल्यालाआ चताआ चव्यान चरातघ चहायलारा चयचंजा चहेआ.''

परशुराम असं म्हणाला तरी आम्हांला नव्या घरात लवकर का राहायला जायचं आहे ते कळेना.

नमीला आमची 'च'ची भाषा कळत नव्हती. ती माझ्या पाटाशेजारी सरकून म्हणाली,

''ए, परशू काय म्हणाला सांग ना रे —''

''अगं, आपल्याला किनी नव्या घरात राहायला जायचं आहे.''

काकाजींना विचारलं, ''काकाजी! हो का जी, आपल्यास नव्या घरात राहायस जायचं आहे का जी?''

''अं —?''

''मग राजेश्वर दत्तात्रेयच्या घराचा वास्तू झाला, तसा आपल्याही नव्या घराचा वास्तू होईल का जी?''

तशी आई वसकन ओरडून म्हणाली,

''जेव जेव. वाहयातपणा करू नको.'' मग आमचे नानाजी आईकडे पाहून म्हणाले,

''लेकराईस काहून बोलते? हो रे पोरांनो, आपल्यास नव्या घरात राहायस जायचं आहे.''

तशी आम्ही सारी पोरं 'नवं घर.... नवं घर' म्हणून ओरडू लागलो. ओरडताना गोपूचा हात लागून माझा पेला गलंडला. चिखल झाला. मग काय? धाकट्या काकीनं तरातरा येऊन गोपूच्या पाठीत दोन-चार धपके ठेवून दिले. दादीमायला काही ते आवडलं नाही. पण का कोण जाणे, नेहमीसारखी दादीमाय धाकट्या काकीला त्याबद्दल काही बोलली नाही. नुसती जोराजोरानं माळ ओढू लागली. एरवी आम्हां मुलांना मारलेलं तिला कधीच खपत नसे. आज सारंच काही वेगळं घडत होतं. बऱ्याच वेळानं बापूरावकाकाजी म्हणाले,

''वैनी! आपल्यास मुंगन्याच्या शेंगाची भाजी असन त्त अधिक वाढा ब्वा.''

तसं आईच्या डोळ्यांत पाणी आलं.

''अई! माहा बाप्राव तान्हा व्हता तईचं येहिच्या हाताचं झाड व्हय ते लावलेलं,'' दादीमाय म्हणाली न् मग घराच्या कितीतरी आठवणी दादीमाय सांगू लागली. आम्ही गरिबीत कसे दिवस काढले, कसे कष्ट केले, नागपुरात हे घर बांधायला केवढी यातायात केली, घराला आजोबा किती जपायचे, स्वतःच कसे रंगरंगोटी करायचे, घराला सडासारवण झालं नाही तर आजोबा दादीमायला कसे रागवायचे, ते सारं सांगितलं. डोळे पुशीत दादीमाय म्हणाली,

''गिर्जाकाकीबाईनं, लक्षुमीनं माह्या घरी येन्यापरत म्हनावं, मायदादी! तुहं घर कसं गोकुळासारखं गमते. तुहे लेक कसे रामलक्षुमनासारखे नांदतेत. आता का राह्यलं? बापाच्या हातचं सारं घालवलं, एव्हढं घर राह्यलं व्हतं सावलीत त्त तेही.....''

आणि दादीमाय पदरानं तोंड दाबून रडू लागली. तिला नानाजींनी, मोठ्या काकाजींनी समजावलं. आमची जेवणं आटोपली.

अंथरुणावर झोपायला गेल्यावर परशूनं सांगितलं,

''आपलं किनी ब्वा दहा वर्षांपूर्वी मोठ्ठं कापडाचं दुकान होतं. ते दुकान डुबलं न् आपल्यास कर्ज झालं. त्याचंच त्त कचेरीत भांडण चालू होतं. त्या कर्जासाठी आपलं घर आज विकलं.''

''विकलं का रे आपलं घर?'' नमीनं विचारलं.

''म्हणून दादीमाय रडली का रे?'' गोपूनं विचारलं.

''खरंच विकलं आपलं घर?'' मी विचारलं.

''हो, आता आपल्यास म्हणूनच नव्या घरात राहायस जायचं आहे.''

मोठे काकाजीं घरी आले, की मोठी काकी विचारी,

''सापडलं का घर?''

''कायचं सापडते एवढ्या लवकर?''

आईसुद्धा कधी नानाजींना विचारी,

''तपास नाही लागला का घरचा? इतवारीत पाहायचं अस्तं.''

''पाह्यलं. पन सोतःच्या घराएवढं घर मिळते का कोठं? आन् इतवारीत घेऊन कसं निभंल? बापूरावास आफिस दूर पडते म्हनते तो.''

आणि कधी धाकटी काकीसुद्धा बापूरावकाकाजींना एकटं गाठून म्हणे,

''कशाला भानगडीत पडता मोठ्या घराच्या? होतं स्वतःचं घर ते तर तुमच्या भावांनी घालवलं. आता करायचं काय एकात राहून? मुंबईला एका खोलीतसुद्धा संसार करतात.''

''अगं, पण दादीमायस काय वाटंन?''

दादीमाय मात्र काहीच बोलत नसे. घर मिळालं ह्याबद्दल चुकून विचारत नसे. आताशा तिनं सकाळचा सैंपाक करणंसुद्धा सोडून दिलं होतं. ती नुसती देवघरात बसून राहायची. सारखी माळ जपायची. मधून मधून पदरानं डोळे पुसायची.

आमच्याकडे आताशी शेजारीपाजारी भेटायला येत. आम्ही घर विकलं याची खोटी हळहळ व्यक्त करत. त्यांच्याशीसुद्धा दादीमाय धड बोलत नसे. सारे म्हणत, 'दादीमायला कशाचा तरी धक्का बसला आहे.'

परवा नानाजी रात्रीचे उशिरा घरी आले. एकटेच जेवायला बसले. मला झोप येत नव्हती म्हणून मीही सैंपाकघरातच बसलो होतो. खरं म्हणजे मला एकट्याला आमच्या माडीत भीती वाटायची; म्हणून आईचं काम आटपण्याची मी वाट पाहत होतो. नानाजीला आई सांगत होती,

''सासुबाईंचं काही ठीक दिसत नाही.''

''काहून?''

''रात्रीच्या उठतेत न् साऱ्या भिंती चाचपडत रडतेत. मज त्त वाटते का —''

''का?''

''न जानो, जुनं मानूस आहे. कोठं काही मामाजीच्या हातचा पैसाआडका म्हना, का सोनंनानं म्हना, रोवून त्त नसंन ठेवला भिंतीत?''

''काह्याचा पैसाआडका नं काह्याचं सोनं आलं? म्हातारीचा सारा जीव ह्या घराच्या मातीगोट्यात कालवला आहे.'' न् मग नानाजींनी डोळे पुसले.

मुदतीचा एक महिना संपत आला. आम्हां साऱ्यांना पुरेल एवढं मोठं घर काही आम्हांला मिळालं नाही. एक दिवस बापूरावकाकाजींनी त्यांना बर्डीवर दोन खोल्या मिळाल्याचं सांगितलं. नानाजींनीसुद्धा चिटणीसपुऱ्यात माडीवरच्या दोन खोल्या मिळवल्या होत्या. मोठे काकाजी मस्कासाथेत द्वारकाबाई चंद्रपूरकरांच्या वाड्यात राहायला जाणार होते.

घर मिळाल्यापासून घरात रोज धुसफूस चालू होती. भांड्याकुंड्यांच्या न् सामानाच्या वाटण्या काही मनासारख्या होत नव्हत्या. आम्हा मुलांतसुद्धा रोज दोन गोष्टींची वाटणी चालायची. एक म्हणजे पितळी पिंजऱ्यातला राघू न् दुसरी आमची दादीमाय! आम्हां साऱ्याच मुलांना त्या दोन्ही गोष्टी आपआपल्या घरी हव्या होत्या. त्यानं आमचीसुद्धा वाटणी जमत नसे. आमच्यांतसुद्धा कडाक्याची भांडणं व्हायची. अगदीच जास्त झालं, की दादीमायजवळ जायचो. परशू विचारायचा,

''दादीमाय, तू कोणाची व?''

''बापा परशुरामा! मी तुहीच आहे.'' दादीमायनं परशूला असं म्हटलं की मी विचारायचा,

''दादीमाय, माझी नाही का व तू?''

''मुकुंदा, पिल्या, तुहीच आहे मी.'' आणि दादीमायनं मला असं म्हटलं की गोपू विचारायचा,

''दादीमाय, आमची नाही तू?''

''कशी नाही बापा? साऱ्याईची आहे मी.''

आमची भांडणं त्यानं उलट अधिक वाढायची. आमची भांडणं वाढली

की दादीमाय चिडून म्हणायची, "लाह्याने तसेच, मोठे तसेच, तुमच्या आज्याच्या हातचा पैसाआडका, घरदार, सोनंनानं — सारं गेलं. आता मीच एक राहयली वाटनी करायची. करा माहे कांडके न् घ्या वाटून."

दादीमाय अशी रागावली की आम्ही चूप होत असू. पण हळूहळू 'दादीमाय आमची — दादीमाय आमची' म्हणत एकमेकाला चिडवून भांडत असूच.

आज दुपारी चाराच्या आत आम्हांला नव्या घरात राहायला जायचं होतं. बापूरावकाकाजी घरातले सारे खिळे, खिडक्यांच्या, काचा, फळ्या, खुंट्या, कपाटाची कवाडं, टिनाचे पत्रे – जे काही निघण्यासारखं होते ते काढत होते. त्यात भिंती उखरत होत्या, दरं पडत होती. घराला अवकळा येत होती. पण आम्हांला त्याची पर्वा नव्हती. आता का ते घर आमचं होतं? दादीमायला मात्र ते आवडलं नाही. ती तीन-तीनदा बापूरावकाकाजीला घर उकरू नको



म्हणून सांगू लागली, पण बापूरावकाकाजीचं काम चालूच होतं. सारं घर अगदी रिकामं झालं होतं. फक्त पुढल्या माडीत भिंतीत बसवलेला एक जुना, पाच-सहा ठिकाणी तडा गेलेला आरसा तेवढा राहिला होता. त्या आरशात एकाच माणसाची कितीतरी रूपं दिसायची. त्या आरशात पाहत बापूरावकाकाजी म्हणाले,

''जा रे पोरांनो, सब्बल आणा.'' आम्ही सब्बल आणताच बापूरावकाकाजी भिंत खणू लागले. खणण्याचा दणादणा आवाज ऐकून दादीमाय माडीवर आली. जिना चढल्याने तिला दम लागला होता. तिच्याने शब्दसुद्‌धा नीट बोलवत नव्हता. दम छाटीत मोठ्या कष्टानं दादीमाय म्हणाली,

''अगा बाप्राव! भिंत पडंन का गा?''

''अव नाही व. तू जा खाले.''

''आईक बापा माहं. भिंत पडून जाईन गा. तुज माही आन आहे. बापा त्या अयन्याचं का करते तू? भिंत पडली म्हनूजेन?''

''पडंन त्त पडंन. घर का आपलं आहे?''

''व्रा गा. इत्के रोज ह्या सावलीत काहाडल्ये त्याचं तुज काही नाही का गा?''

पण बापूरावकाकाजींनी काही एक ऐकलं नाही. दादीमायला जबरीनं खाली पाठवून दिलं. बरीच भिंत उकरल्यावर एकदाची ती आरशाची फुटकी भिंग बाहेर निघाली. बापूरावकाकाजींना समाधान वाटलं.

आम्ही सारे आता एकत्र जेवायला बसलो होतो. बरेच दिवसांनी सारे असे एकत्र जेवायला बसलेलो असूनही कुणीच कुणाशी बोलत नव्हतं. जरा वेळानं दादीमाय नानाजीला म्हणाली,

''नाना, सारं सामान गोळा केलं तुम्ही, पर मागल्या अंगनातलं तुळशीचं बिंद्रावन नाही काहडलं?''

त्यावर बापूरावकाकाजी मध्येच म्हणाले,

"तुही खूप आहे दादीमाय. अवं दोन खोल्यांच्या घरात हे वृंदावन नेऊन ठेवते कोठं?"

"खरंच दादीमाय, कोठं ठेवशील वृंदावन?" नानाजींनी विचारलं.

"कोठंही ठेवा बापा, मी का सांगू? पर तुळस नको घरात? इतके रोज ह्या बिंद्रावनाची म्या...."

"अं. झालं असंन. तुज दगडामातीचाई लोभ सुटत नाही," बापूरावकाका म्हणाले.



तीनच्या सुमाराला बापूरावकाकाजी तीन टांगे घेऊन आले. सासरी जाताना आमची मनुआत्या जशी हळूहळू रडायची तशीच सारी मोठी माणसं रडत होती. पण दादीमाय मात्र कुठं दिसत नव्हती. मोठ्या काकीची पाण्याची कळशीही दिसत नव्हती. सारेजण 'दादीमाय कुठं आहे?' म्हणून एकमेकाला विचारत होते. मोठे काकाजी 'दादीमाय दादीमाय' म्हणून हाक मारत घर शोधत होते. नानाजी कसल्याशा भीतीनं विहिरीतही डोकावून आले होते. मग बापूरावकाकाजी माडीवर गेले. पाच-दहा मिनिटांनी एका हातात मोठ्या काकीची पाण्याची कळशी न् दुसऱ्या हातानं दादीमायचा मातीनं भरलेला हात धरून ते खाली आले. दादीमायचं सारं अंग चिखलाने माखलं होतं. दादीमाय धापा टाकत होती. तिच्या अवताराकडे पाहून नवलानं मोठ्या काकाजींनी विचारलं,

''बापा! दादीमाय धाब्यावर का करत होती?''

बापूरावकाकाजी म्हणाले,

''पिशीच आहे म्हातारी. मघा म्या भिंतीतून आरसा काढला त्येत भिंत उखरली, त्याज गारा करून लिपत होती.''

मोठ्या काकाजीनं दादीमायला आपल्या टांग्यात बसवलं. दादीमाय लहान मुलासारखी हुंदके देऊन रडत होती. तीन-तीनदा घराला हात जोडत होती.

टांगेवाल्यांनी चाबूक मारताच तीन दिशांना आमचे टांगे चालू लागले. हळूहळू आमचं घर आमच्या डोळ्यांआड झालं.

**प्रश्न :**

अ. १. लेखकाच्या घरी नेहमीपेक्षा आज जेवणाच्या वेळी वातावरणात कोणता बदल जाणवत होता?

२. बापूरावकाकाजींनी मुंगन्याची भाजी मागताच दादीमायला कोणत्या आठवणी आल्या?

३. आरसा काढलेल्या ठिकाणी दादीमाय गारा का लिपत होती?

आ. कोण, कोणास आणि का म्हणाले ?

१. लेकराइस काहून बोलते?

२. विकलं का रे आपलं घर?

३. पिशीच आहे म्हातारी.

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. गोकुळ, वृंदावन या शब्दांचे वेगवेगळे दोन अर्थ सांगा.

२. दादीमायच्या स्वभावाचे वेगवेगळे पैलू दाखवणारे दोन प्रमुख प्रसंग तुमच्या शब्दांत लिहा.

३. घर गर्जून उठणे, घराचा वास्तू होणे, दुकान डुबणे, जीव कालवणे या वाक्प्रचारांचा अर्थ सांगून वाक्यांत उपयोग करा.

४. ही कथा संवादरूपाने वर्गात सादर करा.

५. 'माझे घर' या विषयावर दहा वाक्ये लिहा.

**६. हवा शुद्ध राहण्यासाठी घर वा घराच्या परिसरात तुम्ही कोणकोणत्या वनस्पतींचे संगोपन कराल ते सांगा.**

**७. तुळस आणि अन्य औषधी वनस्पतींची माहिती मिळवून मित्र-मैत्रिणींना कळवा.**

**व्याकरण :**

१. तुझ्या पिशवीत जे काय असेल ते पाहू.

२. कोणी कोणास हिणवू नये.

वरील वाक्यांत 'काय', 'कोणी', 'कोणास' हे शब्द वापरले आहेत, पण वाक्यात प्रश्न विचारलेला नाही. या वाक्यांतील काय, कोणी, कोणास ही सर्वनामे कोणत्या नामांबद्दल आली आहेत, हे निश्चित सांगता येत नाही; म्हणून अशा सर्वनामांना **सामान्य सर्वनामे** म्हणतात.

खालील वाक्यांतील सामान्य सर्वनामे ओळखा.

१. पण का कोण जाणे, नेहमीसारखी दादीमाय धाकट्या काकीला त्याबद्दल काही बोलली नाही.

२. कोणी काही म्हणो, आपण आपला मार्ग सोडू नये.





# ८. आमचे अन्नदाते

**वि. स. गोगटे (विनायक सदाशिव गोगटे)** — 'सुखाचा शोध' हा प्रबंध, 'गिरनारच्या छायेत' हा स्फुट निबंधसंग्रह आणि नाट्यछटांचा संग्रह इत्यादी लिखाण.

काही माणसे मोठ्या आढ्यतेने बोलत असतात, फुशारकी मारत असतात. त्यांना कल्पनाही नसते, की बोलण्याच्या भरात आपण आपले दोषही प्रकट करत असतो. हे नाट्यछटेच्या द्वारा फार छान मांडता येते.

गोगटे यांनी पुढील नाट्यछटेत असेच एक गमतीदार चित्र रेखाटले आहे.

या रावसाहेब! बसा. आज फार दिवसांनी कृपा झाली आमच्या दुकानावर! अरे, रावसाहेबांना पानसुपारी आण बरं! काय हुकूम आहे? काय म्हणता? हुकूम नाही, तक्रार आहे? काय तक्रार आहे? अहो, गिऱ्हाइकांच्याकडून तक्रार येईल असं आम्ही कधी करतच नाही मुळी! आमचा माल चोख! आमच्या किमती माफक! आमची वजनं-मापं तर काय, अगदी सरकारी शिक्क्याची! काय म्हटलंत रावसाहेब? माझं बोलणं तर ऐकूनच घेत नाही तुम्ही! वा रावसाहेब! अहो, तुमचे हुकूम ऐकायला तर बसतो सकाळपासून रात्रीपर्यंत दुकानावर. अहो, आमचं गिऱ्हाईक हेच आमचे अन्नदाते! तेच आमचे देव! काय, तुमचं चऱ्हाट बंद ठेवा म्हणता! बरं बुवा! हे बोलणे बंद आता. फर्मावा आपला हुकूम. अहो, आम्ही आपले ताबेदार आहोत. आपला हुकूम व्हायचा अवकाश, की बजावलाच तो आम्ही! अहो, गिऱ्हाइकांची खोटी किंवा गैरसोय होऊ नये म्हणून मुद्दाम दहा नोकर ठेवले आहेत आम्ही दुकानावर. असे सगळे कसे अगदी एकाहून एक हुशार अन् इमानी बरं का? कध्धी फसवायचे नाहीत—काय म्हणता? तुम्हांला फसवायचे नाहीत, फक्त गिऱ्हाइकांनाच फसवतात? वा! वा! रावसाहेब,

आपला स्वभाव फारच विनोदी बुवा! अहो, असं कधी झालं आहे? अहो, जसे आम्ही तसेच नोकर! काय म्हणता? मी तरी तेच म्हणतो आहे? अहो, आमच्या 'कोल्हे अँड सन्स'च्या चोख व्यवहाराची ख्याती सगळ्या जगभर — का रावसाहेब, हसता आहात? अहो, जगभर म्हणजे काय? या गावात — निदान गल्लीत तरी जगजाहीर आहे. काय म्हणता — ते सारं खरं, पण मला केव्हा बोलू देणार? अहो, बोला की! रावसाहेब, तुमचा शब्द म्हणजे पैशापेक्षा आम्हांला अधिक किमतीचा वाटतो. काय, मग बिलाच्या पैशाऐवजी शब्दच लिहून धाडत जाईन म्हणता? फारच विनोदी स्वभाव आपला, रावसाहेब! आम्हांला की नाही आपल्यासारखी आनंदी गिऱ्हाइकं फार फार आवडतात. कधी मालाची तक्रार नाही, पैशाची खोटी नाही, काही नाही. काय म्हणता? परवाच्या तांदळात लाखो अळ्या होत्या? अहो, पावसाळ्यात अळ्या या व्हायच्याच! काय म्हटलंत — हा तर उन्हाळा आहे? अहो, ते खरं, पण मागच्या पावसाळ्यातल्या अळ्या आहेत त्या! अहो, जुने तांदूळ चांगले म्हणून मी आपल्याला मुद्दाम धाडले. आपल्याला — अन् वाईट माल? मनातदेखील आणू नका अगदी! अहो, वाईट माल गळ्यात बांधायची गिऱ्हाइकं वेगळी ! अहो, तांदळात जितक्या अळ्या अधिक तितके ते अस्सल जुने आहेत म्हणून समजावं. अळ्या काढून टाकून धाडले, की गिऱ्हाइकाला उगीच संशय येतो, की आम्ही नवेच तांदूळ पाठवले आहेत! काय म्हणता? त्या दिवशीचे नारळ सगळे गोटे निघाले? अहो, ते नारळ आम्ही मुद्दाम जपानहून मागवले आहेत. फारच महागाईचे आहेत ते; पण आपल्याला ते नेहमीच्या भावाने दिले आहेत. बरं का, जपानी लोकांना की नाही नारळात पाणी अगदी खपत नाही. म्हटलं आपले मावसचुलत बंधू जपानला जाऊन आले आहेत, तेव्हा आपल्याला तसलेच नारळ आवडत असतील. अहो, मुद्दाम मजूर लावून निवडून काढले तसले नारळ. त्याची मजुरीदेखील लावली नाही बरं का आपल्या बिलात! काय म्हणता, फार-उपकार झाले? वा! वा! रावसाहेब! अहो, त्यात उपकार कसले?

अहो, गिऱ्हाइकांचा संतोष हेच आमचे बक्षीस! काय, गव्हाचा भाव बिलात दुप्पट लावला आहे म्हणता? छे हो! असं कसं होईल! पाहू द्या मला बिल! दोन रुपये दोन आणे लावले आहेत म्हणता? हो, आहे खरं. काय हा आमचा कारकून बेफिकीर आहे पाहा! अहो, हिशेबाच्या कामात असली घोडचूक करायची म्हणजे काय? अहो, नेहमी अशा चुका करतो हा! मी आता त्याला रजाच देणार आहे मुळी! अहो, एवढाले पगार द्यावे, पण दुकानात एक नोकर कामाचा असेल तर शपथ! सगळे एकजात चुकार अन् लुच्चे! काय म्हणालात? साखर पाच शेरांच्या बदली चार शेरच भरली? असं व्हायचं नाही कधी रावसाहेब. काय म्हणता घरी चक्क वजन करून पाहिली? अहो,



मग बरोबरच आहे! साखरेला मुंग्या म्हणजे कोण! अहो, बोलून चालून साखरच ती! दुकानातून घरी नेईपर्यंत शेरभर साखर मुंग्यांनी सहज चट्ट केली असेल, म्हणून कमी भरली असेल ती, दुसरं काय? काय म्हणता? पावशेर बडीशोपच्या ऐवजी दोन शेर बाळंतशोपा काय पाठवल्यात? छे छे! असा गाफीलपणा आमच्या दुकानात कधीच व्हायचा नाही. काय म्हटलंत? गिऱ्हाईक झालो, तरी बडीशोप कोणती अन् बाळंतशोपा कोणत्या हे समजण्याची मला अक्कल आहे? वा, असं काय बोलता आपण, रावसाहेब? काय रे राया, काय म्हणताहेत हे रावसाहेब? काय म्हणतोस? रानड्यांच्याकडे बडीशोप अन् कानड्यांच्याकडे बाळंतशोपा पाठवल्या? अरे गाढवा, तू जिनसांची अदलाबदल केलीस! अरे, कानडेसाहेब यांना बडीशोप हवी होती. एका अक्षराच्या फरकामुळं एवढा घोटाळा झाला पाहा, रावसाहेब! बाकी बाळंतशोपासुद्धा असाव्या नेहमी घरात. नावामुळं जरा घोटाळा झाला. नाहीतर आमच्या हातून असं कधी व्हायचं नाही. अहो, आमचा माल चोख! आमच्या किमती माफक ! अन् आमची वजनंही! का रावसाहेब! एकदम उठलातसे? घाई आहे वाटतं जायची? या, काही हुकूम असला, तर कळवत जा!

प्रश्न :

अ. १. दुकानदार आपल्या मालाची स्तुती कशा प्रकारे करतो?
२. तो गिऱ्हाइकाला खूश ठेवण्यासाठी कोणकोणत्या विशेष नावांनी संबोधतो?
३. दुकानदार हिशेबात झालेली चूक कबूल करताना कोणती चतुराई करतो?
४. 'आपला स्वभाव विनोदी बुवा' असे गिऱ्हाइकास दुकानदार कोणकोणत्या वेळी म्हणतो?

आ. खालील तक्रारींना दुकानदाराने दिलेली उत्तरे लिहा.
१. परवाच्या तांदळात लाखो अळ्या होत्या.
२. नारळ सगळे गोटे निघाले.
३. साखर पाच शेरांऐवजी चार शेरच भरली.
४. रानड्यांच्याकडे बडीशोप आणि कानड्यांच्याकडे बाळंतशोप पाठवली.

इ. खालील म्हणी पूर्ण करा.

१. हपापाचा माल ………

२. गाढवाला ………

३. पी हळद ………

४. अंधळे दळते नि ………

ई. विरुद्ध अर्थाचे शब्द लिहा.

महागाई, उपकार, गिऱ्हाईक, इमानी, सोय.

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. तुमच्या शाळेतील 'शालेय वस्तुभांडाराचे कार्य' या विषयावर दहा ओळी लिहा.

२. दिवाकरांच्या नाट्यछटा वाचा.

३. तुम्ही महिन्याचा किराणा आणायला दुकानात गेला आहात, त्या प्रसंगी होणारा संवाद दहा ओळींत लिहा.

४. दुकानातून माल/वस्तू घेताना खालील गोष्टी तपासून घ्या.
किंमत – कालबाह्य होण्याची तारीख — दर्जा — वजन — हिशेब.

५. घरातील धान्य टिकविण्यासाठी निसर्गातील कोणकोणत्या गोष्टींचा उपयोग करता येतो याबाबतची माहिती मिळवा.

**व्याकरण :**

१. आज फार दिवसांनी कृपा झाली आमच्या दुकानावर.

२. मी आता त्याला रजाच देणार आहे.

वरील वाक्यांतील 'आज', 'आता' हे शब्द त्या त्या वाक्यातील क्रिया केव्हा, किती वेळ किंवा किती वेळा घडते अशी विशेष माहिती सांगतात. ही माहिती त्या क्रियापदांच्या वेळेबद्दलची असते, म्हणून अशा शब्दांना **कालवाचक क्रियाविशेषणे** असे म्हणतात.

खालील वाक्यांतील कालवाचक क्रियाविशेषणे ओळखा.

१. उद्या दसरा महोत्सवात बक्षीस वितरण आहे.

२. मी दररोज पहाटे योगासने करतो.





# ९. दौलत

**म. भा. भोसले (मल्हारी भाऊराव भोसले)** — यांनी ग्रामीण जीवनावर उत्तम कथा व कादंबऱ्या लिहिल्या आहेत. 'समरांगण', 'उघड्या जगात' व 'एका आईची लेकरे' या यांच्या कादंबऱ्या. 'जिवाचा सखा' या मराठी चित्रपटाची कथा भोसले यांची आहे. हा पाठ यांच्या 'अहेव लेणे' या पुस्तकातून घेतला आहे.

भोसले यांनी आपल्या कथांतून ग्रामीण जीवनाचे बारकावे टिपले आहेत. दौलत या कथेत मानवता हीच खरी दौलत आहे, हे त्यांनी प्रभावीपणे सांगितलेले आहे.

'नाही' हा शब्द दौलतने मोठ्या निर्धाराने उच्चारला. तो शब्द ऐकून तात्या देशमुखांनी झटक्याने मान फिरवली अन् ते रागाने चालते झाले.

ते तसे गेल्यावर मात्र दौलतच्या मनाला प्रश्न पडला, आपण केले हे बरोबर की चूक? तात्या देशमुख गावातले वजनदार देशमुख तर होतेच, शिवाय दौलतचे उपकारकर्तेही होते. त्या दिवशी घरात नदीचे पाणी शिरल्यावर मोठ्या मेहरबानीने तात्यांनी त्याला आपल्या जुन्या वाड्यात राहायला जागा दिली होती. गेले पंधरा दिवस तो तेथे राहत होता. घरातील ओल पूर्ण सुकेपर्यंत म्हणजे आणखी महिनाभर तरी त्याला त्यांच्या वाड्यात राहणे भाग होते.

अशा स्थितीत ते आपल्याकडे येतात, मुलांना स्टेशनपर्यंत पोचवण्यासाठी गाडी जुंपायला विनवतात आणि आपण त्यांना 'नाही' म्हणतो हे बरोबर की चूक?

एक प्रकारे ते बरोबर होते.

आज पोळ्याचा दिवस! बैलांचा वर्षातला सणाचा दिवस! या दिवसाचे महत्त्व शेतकऱ्यांशिवाय इतरांना कधीच कळायचे नाही. बारा महिने तेरा काळ मातीत खपून मोती पिकवणाऱ्या बैलाची या दिवशी शेतकरी पूजा

करतो, त्याला गोडधोड खायला घालतो, रंगवतो, झूल घालतो आणि हौसेने त्याची मिरवणूकही काढतो. वर्षभर खपून जगाला जगवणाऱ्या बैलाला फक्त आजचा एकच दिवस विसावा मिळत असतो अन् अशा दिवशी तात्या येऊन म्हणत होते, 'माझ्या मुलांना सिनेमा बघायला सांगलीला जायचंय, तेवढं त्यांना गाडीतून स्टेशनपर्यंत पोचव!'

कसे शक्य होते ते? जातिवंत शेतकरी पोळ्याच्या सणादिवशी बैलाला कधीही जुंपणार नाही. अर्थात आपण 'नाही' म्हटले हे बरोबरच केले,असे दौलतला वाटले.

पण तात्या गावातला श्रीमंत, प्रतिष्ठित माणूस. आपण त्यांच्या घरात राहून मिंधे झालेलो. अशा स्थितीत आपण नाही म्हणणे म्हणजे त्यांचा केवढा अपमान झाला! त्या अपमानामुळेच ते रागाने निघून गेले. त्यांना जो राग आला तो जसा त्यांच्या अपमानाचा, त्याचप्रमाणे आपण त्यांना 'नाही' म्हणाल्याने आपल्या दिसलेल्या उद्‌दामपणाचाही! ते आपणाला आज उद्‌दाम, उर्मट असेच म्हणत गेले असतील!

पण आज आपण काही जाणूनबुजून उद्‌दामपणा केला नाही. उर्मटपणा तर नाहीच नाही. आपण आपला धर्म पाळला. माझ्या वागण्याने त्यांना राग आला तर त्याला मी तरी काय करणार? खरे म्हणजे तात्यांनी असे रागवायलाच नको होते; पण ही श्रीमंत माणसे, चार पैशाच्या किंवा प्रतिष्ठितपणाच्या जोरावर सगळ्या जगावर सत्ता गाजवू पाहणारी. ही अशीच असायची! पण त्यांना कोण भितो?

या विचाराने दौलतचे मन शांत झाले अन् तो हौसेने बैलांना झुली घालून सजवायच्या कामाला लागला.

त्याने चमकदार रंगाने बैलांची शिंगे रंगवली. त्यांवर सोनेरी बेगडाच्या आडव्या पट्ट्या लावल्या. त्यांच्या कपाळावर आरशांची बाशिंगे बांधली, गळ्यात फुलांच्या माळा घातल्या आणि अशा तऱ्हेने सुशोभित केलेल्या आपल्या बैलांकडे तो कौतुकाने पाहत राहिला. त्या कौतुकाने मन भरून

आल्यामुळे त्याच्या मनाच्या यातना बुजून गेल्या. तात्या आपल्यावर रागावून गेले याची तर त्याला पुसट आठवणही राहिली नाही.

आपल्या सजवलेल्या बैलांकडे पाहताना त्याचे मन सुखाने पुरेपूर भरून गेले.

त्याच वेळी त्याला कुणीतरी येऊन बातमी सांगितली — 'बळी चव्हाणाला बैलानं मारलंय. मोठी जखम झालीय!' ते ऐकताच त्याचे मन अस्वस्थ झाले.

बैलांच्या मिरवणुकीची वेळ होत आली होती. खोताच्या वाड्यापुढे वाजणारी सुरेल सनई त्याला स्पष्ट ऐकू येऊ लागली. बैलांना घेऊन जायची त्याची सगळी तयारी झाली होती; पण त्याचे त्याकडे लक्षच लागेना. सनईचा आवाज त्याच्या कानांत शिरेना. आपले सजवलेले बैलही त्याला स्पष्ट दिसेनात. त्याला एकच देखावा दिसत होता, एकच आवाज ऐकू येत होता — जखमेने रक्तबंबाळ झालेला बळी चव्हाण अन् त्याच्या मुखातून निघणारा वेदनामय व्याकूळ उद्‌गार!

बळी त्याचा सगासोयरा नव्हता, भाऊबंद नव्हता, इष्टमित्र नव्हता. तो गावातला एक त्याच्याचसारखा सामान्य शेतकरी होता.

पण मानवी मन हे फक्त नात्याच्या किंवा मायेच्या माणसासाठीच व्याकूळ होत नाही, तर कुठल्याही मानवी दुःखाने ते घायाळ होते. बेचैन होते, बधिर होते.

बळीला पाहण्यासाठी दौलतचे मन अधीर झाले. त्याने शृंगारलेले बैल तिथेच सोडले, मिरवणुकीला उशीर झाला, तरी हरकत नाही, असे त्याला वाटले. तो निघाला बळीला बघायला.

बळीला बघायला लोकांची गर्दी झाली होती; पण ती नुसती बघ्यांची गर्दी असे दौलतला वाटले. प्रत्येकजण हळहळत होता. 'दवाखान्यात न्यायला पाहिजे, डॉक्टर बोलवायला पाहिजे', असे प्रत्येकाच्या तोंडातून निघत होते. पण ते करायला एकही धजत नव्हता. त्या गर्दीला बाजूला सारून दौलत

बळीजवळ गेला. बळीच्या मांडीत शिंग घुसले होते. रक्तस्राव भलताच झाला होता. फेट्याने त्याची मांडी आवळली होती, तरी अजून रक्त ठिबकत होतेच. भलत्या रक्तस्रावाने बळीला मूर्च्छा आली होती. त्याची म्हातारी आरडत-ओरडत होती अन् त्याचा भाऊ त्याला धरून बसला होता. अशा तऱ्हेने वेळ घालवणे म्हणजे बळीला मृत्यूच्या दाढेत लोटण्यासारखेच होते. ते ध्यानात येताच दौलत बळीच्या भावाला म्हणाला, "असं बसून कसं भागणार? आताच्या आता डॉक्टरला आणलं पाहिजे, नाहीतर याला मिरजेला नेला पाहिजे."

"मिरजेलाच न्यावं म्हणतोय; पण अजून गाडी जुंपून आली नाही!"

"कोण गेलंय काय गाडी आणायला?"

"गेलेत दोघंजण, पण ते तिकडंच!"

"अरे, हे का दिरंगाईचं काम? चारची गाडी आता येईल. गाडी जुंपून चालायलाच हवं आता लगेच स्टेशनकडे! थांब, मीच येतो माझी गाडी घेऊन दोन मिनिटांत!"

असे बोलून उतावळीने दौलत घराकडे पळत आला. पोळा, मिरवणूक, बैलांचा शृंगार सगळे सगळे विसरला. लवकरात लवकर बळीला स्टेशनवर कसे पोचवावे ही एकच गोष्ट त्याच्या मनात थैमान घालू लागली.

बैलांच्या झुली काढण्यातसुद्धा वेळ दवडणे त्याला बरे वाटले नाही. झुलीसह तसेच बैल त्याने गाडीला जोडले. गाडी बळीच्या दारात नेली. गाडीत एक तढव अंथरला आणि तिघा-चौघांनी बळीला अलगद उचलून गाडीत घातले. गाडी स्टेशनच्या रस्त्याला लागली.

स्टेशनपर्यंतचे अंतर भराभरा कमी होत चालले; पण स्टेशन येईपर्यंत गाडी चुकेल की काय, ही एकच काळजी दौलतच्या जिवाला लागली होती. अखेर

जेव्हा स्टेशन आले, अन् गाडीला अवकाश आहे असे कळले, तेव्हा त्याचा जीव भांड्यात पडला.

मग सावकाश बळीला बैलगाडीतून उतरून स्टेशनात नेले. त्याच्या बरोबर मिरजेस जाण्यासाठी दोघा-तिघांची योजना झाली. तेवढ्यात स्टेशनात गाडीही आली. बळीला व्यवस्थित चढवून बसवला गेला. गाडी निघून गेली. नंतर दौलत स्टेशनबाहेर पडून आपल्या गाडीजवळ आला अन् त्याने निवांतपणे पानाची चंची सोडली.

आता पान खाऊन तो परत जायला निघणार होता. त्याने सुपारी कातरून तोंडात टाकली, तोच तात्या आपल्या गावाकडे पायी चालू लागलेले त्याला दिसले. त्याबरोबर त्याला आठवले, तात्या मुलांना पोचवायला आलेले दिसतात. कसे बरे आले असतील? मुलांना घेऊन चालतच आलेले असणार! त्याशिवाय काय मार्ग होता? अरे, येताना आपल्याला धांदलीत ते सुचलेच नाही. सहजासहजी त्यांच्या मुलांना आपल्याला गाडीतून आणता आले असते. त्यांचा राग घालवता आला असता. हं! चुकलेच सगळे. असो, आता तरी त्यांना बोलवावे, म्हणून तो चंची सावरत उठला. दोन पावले त्यांच्याकडे गेला. त्याने हाक मारली, ''तात्या! अहो तात्या!''

तात्यांनी वळून त्याच्याकडे पाहिले, निखाऱ्यासारख्या लाल डोळ्यांनी! ती नजर बघताच दौलत बावरला.

तात्यांनी विचारले, ''काय?''

''केव्हासं आलासा?''

''कशाला हवी तुला ती चौकशी? अन् होरे, आज बैलांचा सण आहे ना? गाडी जुंपायची नव्हती ना?''

''पण बळीला भारीच जखम झाली होती. त्याला मिरजेला नेणं जरूरीचं होतं. सण कवाबी करता येईल; पण बळीचे प्राण गेले असते तर?''

तात्या चमकले व झरझर निघून गेले.



**प्रश्न :**

अ. १. तात्या देशमुखांनी झटक्याने मान का फिरवली?

२. कोणती वार्ता ऐकून दौलत अस्वस्थ झाला?

३. दौलतचा निर्णय तुम्हांला योग्य वाटतो का? सकारण लिहा.

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. पोळ्याचा सण कसा साजरा करतात ते मित्राला पत्राने कळवा.

२. या पाठाचे 'दौलत' हे शीर्षक सार्थ का वाटते?

३. दुखावलेल्या तात्या देशमुखांचे व्यक्तिचित्र लिहा.

४. कवी यशवंत यांची 'सण एक दिन' ही कविता मिळवून वाचा व पाठ करा.

५. 'नरम' या शब्दापासून 'नरमाई' असे भाववाचक नाम तयार होते. खालील विशेषणांपासून अशा प्रकारची भाववाचक नामे तयार करा.
नवल, चतुर, भला, स्वस्त, महाग, चपळ.

**व्याकरण :**

१. तू पुढे चल.

२. दौलत, तू इकडे ये.

३. माझ्या घरापासून शाळा जवळ आहे.

वरील वाक्यांतील 'पुढे', 'इकडे', 'जवळ' हे शब्द त्या त्या वाक्यातील क्रिया कोठे घडते याबद्दलची विशेष माहिती सांगतात. ही माहिती त्या त्या क्रिया कोठे घडतात त्या स्थळांची आहे; म्हणून अशा शब्दांना **स्थलवाचक क्रियाविशेषणे** म्हणतात.

खालील वाक्यांतील स्थलवाचक क्रियाविशेषणे ओळखा.

१. तेथे सुंदर फुलांची झाडे आहेत.

२. विमान वर जात होते.





# १०. शांततेसाठी

**विनोबा (विनायक नरहर भावे)** — सुप्रसिद्ध विचारवंत तत्त्वज्ञ. भाष्यकार व भूदान चळवळीचे प्रणेते. सर्वोदयवादी विचारसरणीतून भारताची आर्थिक प्रगती साधू पाहणारे. यांनी गीतेचे मराठीत समश्लोकी भाषांतर केले आहे. ते 'गीताई' या नावाने प्रसिद्ध आहे. यांनी 'आचार्यकुल' स्थापून शिक्षणविषयक नवे विचार मांडले.



'मधुकर', 'जीवनदृष्टी', 'गीताप्रवचने', 'लोकनीती' इत्यादी अनेक विचारप्रवर्तक पुस्तके यांनी लिहिली आहेत.

हा पाठ 'लोकनीती' या पुस्तकातून घेतलेला आहे. स्नेह, भूतदया, अहिंसा, मानवता आणि शांतिप्रियता ही भारतीय विचारांची मूलतत्त्वे आहेत. या तत्वांच्या आधारेच जगातील अद्‌वितीय असा भारतीय स्वातंत्र्यसंग्राम यशस्वीपणे लढवला गेला. भारताच्या शांततेच्या तत्वज्ञानाला सत्याग्रहाच्या अभिनव मार्गामुळे जगात मान प्राप्त झाला आणि सर्व जगाच्या कल्याणाचा एक अद्यतन मार्ग गवसला, हे विनोबांनी या निबंधातून सांगितले आहे.

---

आपल्या देशाला बऱ्याच प्रयत्नांनंतर स्वातंत्र्य मिळाले आहे. स्वातंत्र्याचे संग्राम दुसऱ्या देशांतही झाले, त्यांत त्यांना फार त्याग करावा लागला, हेही सर्व जाणतात. भारताचा स्वातंत्र्यसंग्राम मात्र एका विशेष पद्‌धतीने झाला, ही गोष्ट जगाच्या इतिहासात गौरवाने लिहिली जाईल. स्वातंत्र्यसंपादनासाठी शांतिमय साधनांचा आग्रह ठेवण्यात आला, असा हा एकमेव देश आहे. शांतीच्या मार्गानेच संग्राम व्हावा, असा आमच्या नेत्यांचा आग्रह राहिला आणि सर्व देशाने मोडकातोडका का असेना, पण शांतीचा प्रयत्न केला. त्याचा परिणाम म्हणून आपल्या देशाला स्वातंत्र्य मिळाले. भारताच्या स्वातंत्र्यप्राप्तीत जगाच्या शक्तीची जोड आहे, हे मी जाणतो. इंग्रजांना हा देश अधिक काळ हातात ठेवणे कठीण होते, अशी जगात एक परिस्थिती होती; परंतु त्याबरोबरच येथेही काही प्रयत्न करण्यात आला आणि त्याचा फारच सुंदर परिणाम या देशाच्या इतिहासावर झाला, ही गोष्ट मानावीच लागेल. ज्या देशाबरोबर आमचा लढा होता त्याच्याबरोबर आमचा स्नेहसंबंध टिकला, हेही येथे पाहायला मिळाले. यात भारताचा गौरव आहे, हे आम्ही जाणतो.

एका विशेष प्रकाराने येथील स्वातंत्र्यसंग्राम लढवला गेला असल्याने आपल्या या देशाकडून बाहेरची जनता काही अपेक्षा करते. या देशाचा आवाजही आज जगात श्रेष्ठ झाला आहे. आमच्याजवळ विशेष सेनाशक्ती नाही. संपत्तीही जास्त नाही, तरीही या देशाचा जगावर जो काय परिणाम होतो,

त्याचे कारण आमची स्वातंत्र्यसंग्रामाची साधने आहेत; म्हणून आमच्यावर एक जबाबदारी येते. त्या जबाबदारीच्या गंभीरतेचे आम्हांला भान असले पाहिजे.

आमचा देश एक बालक नसून दहा हजार वर्षांचा अनुभवी जुना देश आहे, हे आपण विसरता कामा नये. भारताच्या इतिहासातही अशी काही विशेषता आहे, की ज्यामुळे जगाची दृष्टी या देशाकडे लागली आहे. दोन हजार वर्षांपासून जी संधी भारताला मिळाली नाही ती आज मिळाली आहे, हे निःसंशय!

आत्मज्ञानाची परंपरा या देशात प्राचीन काळापासूनच होती. आता विज्ञानाची शक्तीही जगात प्रकट झाली आहे. भारताची प्राचीन आत्मज्ञानशक्ती आणि विश्वाची अर्वाचीन विज्ञानशक्ती यांचा मिलाफ होत आहे. जेथे असा मिलाफ होतो, तेथे सर्व प्रकारचे कल्याण वसते; परंतु ते कल्याण जेव्हा त्या ज्ञानविज्ञानाचा आमच्या जीवनात प्रवेश होतो, तेव्हाच होते.

'मानव एक आहे' असा घोष भारताने केला आहे. मानवतेचा स्वीकार करून मानवतेचे माहात्म्य या देशाने गाइले आहे. मानवतेपेक्षा लहान अशी कोणतीही तत्त्वे या देशाच्या संस्कृतीला मंजूर नाहीत. मानवतेहूनही अधिक व्यापक आपण व्हावे, यासाठी येथील ज्ञान्यांनी प्रयत्न केला आहे; म्हणून आम्ही येथील संस्कृतीत गाईंनाही स्थान दिले आहे.

आमच्या समाजशास्त्रात जी खुबी, जे वैशिष्ट्य आहे, ते पश्चिमेच्या समाजशास्त्रात नाही, ही गोष्ट कबूल करावीच लागेल. तेथे सर्वांत श्रेष्ठ शब्द आहे, तो 'ह्युमॅनिटी' म्हणजे मानवता. आमच्या येथे सर्वांत श्रेष्ठ शब्द आहे, तो म्हणजे 'भूतदया'.

मानवसमाजाच्या अधिकातील अधिक भागाचे भले करावे असे पश्चिमेकडील लोक म्हणतात, ते 'सर्वमानवोदय' इच्छित नाहीत.

पण आज या देशात एक विचित्र दशा पाहण्यात येते. येथील लोक आपल्याला विशिष्ट प्रांताचे समजतात. कोणी कर्नाटकचा तर कोणी बंगालचा. ज्या देशातील लोक आपल्याला 'सोऽहम्' म्हणत असत, अर्थात 'ते जे व्यापक तत्त्व ते मी आहे,' असे समजत असत, त्या देशातील लोक आपल्याला एका जातीपुरते मर्यादित मानीत आहेत.

जेथे भाषेला अनुसरून प्रांतरचना होते, तेथे जनतेची सोय होते, ही गोष्ट मी मान्य करतो. जोवर शेतकऱ्याच्या भाषेत राज्यकारभार चालत नाही, तोवर स्वराज्याची प्रचीती येऊ शकत नाही; म्हणून भाषेनुसार प्रांतरचना होणे मी फार महत्त्वाचे मानतो; परंतु यात जो अधिक अभिनिवेश घुसला आहे, त्याचे कारण आमच्या देशाकडून पश्चिमेचे अनुकरण होत आहे, हे आहे आणि ही स्थिती अत्यंत भयावह आहे.

आमचा समाज अहिंसेवर अधिष्ठित असावा, असे आम्हांला वाटत असेल, तर आमची विचार करण्याची पद्धतच बदलली पाहिजे, हीसुद्धा एक गोष्ट येथे लक्षात घेणे जरूर आहे. त्यासाठी आम्हांला समाजाची रचना आमच्या विचारांना अनुसरून केली पाहिजे. आम्हांला पाश्चिमात्यांचे अनुकरण करून चालायचे नाही. आज जगातील सर्वच देशांतील लोकांना शांतीची तहान लागली आहे. ॲटम आणि हैड्रोजनच्या शक्तींनी सर्वच भयभीत आहेत. यांनी जगाचा निश्चित नाशच होईल, आणखी काहीही साधणार नाही, हे सर्व लोकांना कळले आहे; परंतु जर आम्हांला शांती हवी असेल, तर तिला अनुकूल अशी समाजरचना आम्हांला करावी लागेल.

**प्रश्न :**

अ. १. भारतीय स्वातंत्र्य-संग्रामाचे वैशिष्ट्य कोणते?

२. मानवता आणि भूतदया यांबाबत भारताची भूमिका कोणती आहे?

३. जागतिक शांततेसाठी विनोबांच्या मते कोणत्या गोष्टी घडणे आवश्यक आहे?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. भारतीय संस्कृतीतील तीन प्रमुख वैशिष्ट्ये लिहा.

२. भाषावार प्रांतरचनेचे फायदे सांगून त्यांतील संभाव्य धोका स्पष्ट करा.

३. विनोबा असे का म्हणतात, ते थोडक्यात सांगा.

(क) 'सर्व देशाने मोडकातोडका का असेना, पण शांतीचा प्रयत्न केला.'

(ख) 'स्वातंत्र्य आमच्याच प्रयत्नांनी आम्हांला मिळाले, असा मी दावा करत नाही.'

(ग) 'मानवतेपेक्षा लहान अशी कोणतीही तत्त्वे या देशाच्या संस्कृतीला मंजूर नाहीत.'

४. 'मानवतेपेक्षा भूतदयेचा विचार अधिक व्यापक आहे.' या विचाराचा विस्तार करा.

५. गांधीजींनी सांगितलेली 'एकादशव्रते' माहीत करून घ्या आणि त्यांचा अर्थ समजावून घ्या.

**व्याकरण :**

१. ही गोष्ट जगाच्या इतिहासात गौरवाने लिहिली जाईल.

२. एका विशेष प्रकाराने जगाचा इतिहास घडवला गेला.

३. पहाटे मी झटकन उठतो.

वरील वाक्यांतील गौरवाने, विशेष प्रकाराने, झटकन हे शब्द त्या त्या वाक्यांतील क्रियांची रीत दाखवतात, म्हणून त्यांना **रीतिवाचक क्रियाविशेषणे** म्हणतात.

खालील वाक्यांतील **रीतिवाचक क्रियाविशेषणे** ओळखा.

१. आई मुलाला गदागदा हालवून उठवते.

२. झपझप चालले नाजूक पाय.

३. ओढा खळखळ वाहतो.





# ११. ऊर्जाराणी

**गजानन क्षीरसागर (गजानन दामोदर क्षीरसागर)** — संपादक आणि ललित लेखक. मराठीतून विविध विषयांवर सातत्याने लेखन. सुमारे शंभर विज्ञानकथा प्रकाशित. 'अज्ञाताचा वेध', 'विश्वसंहार', 'स्वप्नांचं युद्ध' हे विज्ञान-कथासंग्रह. 'चंद्रमोहिनी', 'अंतराळातील सुवर्णनगरी', 'मंगळाचा सम्राट' या तीन विज्ञान-कादंबऱ्या.

प्रस्तुत पाठात ऊर्जेचे नानाविध स्रोत सांगितलेले आहेत. ऊर्जा अत्यंत कमी खर्चात व कायम स्वरूपात मिळवायची असल्यास अपरंपरागत स्रोत पूर्वी आपल्या वापरात होते, त्यांचे अनुशीलन करून आज कसा उपयोग करता येईल त्याचे प्रतिपादन या पाठातून संवादरूपाने केलेले आहे.

*(ढगांचा गडगडाट. विजेचा कडकडाट. वाऱ्याचा आवाज...)*

**सुमन** : दादा... ए दादा... मला भीती वाटते. केवढा वारा सुटलाय...

**मोहन** : थांब. सुमा... माझा हात घट्ट पकड. भिऊ नकोस...

**सुमन** : दादा... ही बघ. ही कोण देवी? लखलखीत प्रकाशात किती सुंदर दिसतेय ती... हिला नाही भीती वाटत या वादळाची?

**ऊर्जाराणी** : *(प्रवेश करून)* सुमन, मोहन भिऊ नका... मी ऊर्जाराणी...

**मोहन** : ऊर्जाराणी? तुझं नाव तर आज पहिल्यांदाच ऐकतोय मी.

**सुमन** : मीपण...

**ऊर्जाराणी** : होय. मी ऊर्जाराणी... तुमच्या नेहमी उपयोगी पडणारी.

**मोहन** : आमच्या उपयोगी पडणारी? पण मग कधी आम्हांला दिसली नाहीस ती?

**ऊर्जाराणी** : दिसते तर... अगदी नेहमी दिसते; पण या रूपात नाही... निरनिराळ्या रूपांत.

सुमन : म्हणजे जादूगारीणच दिसतेस. सारखी रूपं बदलणारी माणसं जादूगारच असतात म्हणे.

ऊर्जाराणी : जादूगारीण नाही आणि मी माणूसही नाही; पण तुम्हां माणसांना खूप उपयोगी पडणारी. तुम्हांलाच काय अगदी सगळ्या जीवसृष्टीला उपयोगी पडणारी मी आहे.

मोहन : ते कसं काय?

ऊर्जाराणी : सांगू?

सुमन-मोहन : सांग... सांग...

ऊर्जाराणी : ऐका तर... या पृथ्वीवर तुम्ही माणसं केव्हा आलात सांगू शकाल?

मोहन : हो. आमच्या पुस्तकात वाचलंय आम्ही.

ऊर्जाराणी : मग सांग ना!

सुमन : दहा लाख वर्षांपूर्वी! म्हणजे खूप खूप वर्षांपूर्वी.

ऊर्जाराणी : बरोबर. तर तुम्ही पृथ्वीवर आलात आणि निसर्गाच्या कुशीत, झाडांच्या सोबतीनं राहू लागलात. कंदमुळं, फळं हा तुमचा आहार. खूप खूप वर्षं गेली आणि अगदी अलीकडे म्हणजे आठ-दहा हजार वर्षांपूर्वीपासूनच तुम्ही शेती करायला लागलात.

मोहन : होय. हेही वाचलंय. आम्ही जनावरं पण पाळू लागलो आणि बरं का ऊर्जाराणी आम्ही अग्नीचा पण शोध लावला.

ऊर्जाराणी : शाबास, हुशार दिसतोस हं मोहन. माणसानं अग्नी शोधला आणि नेमक्या त्या क्षणापासूनच... माझं... म्हणजेच इंधनाचं महत्त्व त्याच्या लक्षात आलं. जसजशी वर्षं उलटू लागली तसतशी ऊर्जेच्या, इंधनाच्या वापरात तो वाढ करू लागला.

अगदी अलीकडच्या शे-दोनशे वर्षांत तर माझी गरज त्याला फारच मोठ्या प्रमाणात लागू लागली.

**मोहन** : हो... हो. घरात स्वयंपाक करायला, दिवे लावायला, वाहनं चालवायला, कारखान्यातील यंत्रं फिरवायला तुझीच गरज असते खरी. पण ऊर्जाराणी, तुझी ही रूपं मात्र खूप वेगवेगळी आहेत बरं का...

**ऊर्जाराणी** : होय ना. तुमची विज्ञानात प्रगती झाली आणि विजेच्या रूपानं, कोळशाच्या रूपानं, तेलाच्या रूपानं, फार काय वायूच्या रूपानं तुमच्या मी उपयोगी पडू लागले. एवढ्यावरही समाधान होईल ती माणसं कसली, म्हणून मग मी आणखीही दोन रूपं घेतली.

**सुमन** : ठाऊक आहे. अणुऊर्जा आणि... आणि...

**मोहन** : सूर्यऊर्जा... सौर ऊर्जा!

**ऊर्जाराणी** : अगदी बरोबर... एवढी रूपं मी धारण केली आणि तुमच्या उपयोगी पडू लागले; पण तुम्ही मानव म्हणजे फार अधाशी आहात. एवढी तुम्हांला मदत करूनदेखील ऊर्जाराणीनं आणखी ऊर्जा द्यावी म्हणून तुम्ही माझ्या मागं लागलात. मला प्रसन्न करून घेण्यासाठी मग तुम्ही तुमच्या सुंदर पृथ्वीचादेखील विध्वंस करू लागलात.... मी तरी मग तुमच्या वाढत्या भुकेला कशी पुरी पडणार, याचा विचारच करणं तुम्ही सोडून दिलंत. माझा केवढा वापर तुम्ही केलात ठाऊक आहे?

**मोहन** : सांग बरं!

**ऊर्जाराणी** : सांगते. अगदी सोप्या शब्दांत, तुम्हांला कळेल असं सांगते. गेल्या दोन हजार वर्षांचंच गणित आपण मांडू.

**सुमन** : गणित? म्हणजे आली आकडेमोड. मोहन, तूच कर रे बाबा ती! मला गणिताची खूप भीती वाटते.

**ऊर्जाराणी** : इतकं काही अवघड गणित नाही. दोन हजार वर्षांतली एकोणीसशे वर्षं तुम्ही जेवढी ऊर्जा वापरलीत ना, त्याच्या निम्मी ऊर्जा तुम्ही फक्त गेल्या शंभर वर्षांतच संपवलीत.

**मोहन** : हं...म्हणजे एकोणीसशे वर्षांत जर आम्हांला 'दहा' एवढी ऊर्जा लागली असली तर त्या पुढच्या फक्त शंभर वर्षांतच आम्हांला 'पाच' एवढी ऊर्जा लागली.

**ऊर्जाराणी** : बरोबर. आणखी गंमत पुढेच आहे. आता येणारं जे एकविसावं शतक असेल ना, त्या शतकात तर आपल्या या गणिताच्या आकड्यांत बोलायचं तर तुम्हांला 'एकशे पंचवीस' एवढी ऊर्जा लागेल. म्हणजे विसाव्या शतकात लागलेल्या ऊर्जेच्या चांगली पंचवीस पट.

**मोहन** : एवढी? म्हणजे खूपच झाली की... पण मग ही ऊर्जा निर्माण कशी करणार? ऊर्जाराणी तू काहीतरी जादू करशील आणि आम्हांला खूप खूप ऊर्जा देशील. होय ना!

**ऊर्जाराणी** : असं जादूनं काही होत असतं ना तर मग प्रश्नच उरले नसते. एवढी मोठी ऊर्जा हवी म्हणून तुम्ही काय काय वापरता ठाऊक आहे?

**सुमन** : हो. लाकूड, कोळसा, तेल आणि ...

**मोहन** : वायूसुद्‌धा. याशिवाय तू आधीच सांगितलंस ती अणुशक्ती आणि सूर्यशक्तीसुद्‌धा.

**ऊर्जाराणी** : बरोबर. पण मग सूर्यशक्ती सोडली तर बाकी सर्व गोष्टी तुमच्या पृथ्वीवर ठरावीकच आहेत. गेल्या दोन हजार वर्षांत जेवढी ऊर्जा तुम्हांला लागली, तिच्या दहा पट ऊर्जा जर

तुम्हांला येत्या शंभर वर्षांतच संपवायची असेल तर त्यासाठी पृथ्वीचा किती नाश होईल, याचा विचार कधी केलाय तुम्ही?

**मोहन** : खरं आहे बरं का!

**ऊर्जाराणी** : तुमच्या भारत देशात अजूनही स्वयंपाकासाठी लाकडं वापरतात. दर माणसामागे दरवर्षी दोनशे किलो लाकूड जळण म्हणूनच तुम्ही संपवता. म्हणजे वर्षाला सोळा कोटी टन एवढं लाकूड तुम्ही जाळून टाकता. आता हे लाकूड येतं कुठून?

**मोहन** : झाडांपासून. जंगलातून...

**ऊर्जाराणी** : होय ना? मग एवढं प्रचंड लाकूड हवं तर किती झाडं तोडावी लागतील आणि तीसुद्धा दरवर्षी. म्हणजे तुमची सगळी जंगलं नाहीशी होतील. झाडं नसतील तर तुमच्या भारताची सगळी भूमी वैराण होईल.

**सुमन** : हो ना! झाडं नाहीत म्हणून पाऊस नाही. पाऊस नाही म्हणून पिकं नाहीत.

**मोहन** : आणि झाडांच्या अभावी हवासुद्धा बदलेल. सगळं सगळं अगदी वाळवंट होऊन जाईल.

**ऊर्जाराणी** : बरोबर, माझा जास्त जास्त हव्यास तुम्ही धरलात तर तुमचं भविष्य हे असंच असेल. झाडं तोडाल, पृथ्वीच्या पोटातला कोळसा तुम्ही उपसू लागाल, जमिनीत खोल खोल जाल आणि लोभापायी सगळं काही उजाड करून टाकाल.

**सुमन** : पण मग कोळसा आणि लाकूड वापरलंच नाही आणि नुसतं तेल वापरलं तर!

**ऊर्जाराणी** : पृथ्वीच्या पोटात तेल तयार व्हायला हजारो वर्षं लागतात. आता जगात जेवढं तेल पृथ्वीच्या पोटात आहे ते काही फार दिवस तुम्हांला पुरणारं नाही! एक दिवस तेही संपून जाईल,

आणि इंधनच संपलं तर तुम्ही मानव कसे जिवंत राहणार?

**मोहन** : ऊर्जाराणी, आम्ही अगदी लहान आहोत. पण मोठे होऊ त्या वेळी तू सांगितलेलं सगळं अगदी चांगलं लक्षात ठेवू. पण एक वचन तू आम्हांला देशील?

**ऊर्जाराणी** : अरे वा! मीच वचन देऊ का? बरं, सांग कोणतं वचन हवंय तुला?

**मोहन** : मला एकट्याला नको!

**ऊर्जाराणी** : मग? या सुमनला पण हवंय वाटतं?

**मोहन** : आम्हां दोघांनाच फक्त नकोय. आम्हा सर्व मानवांनाच हवंय.

**ऊर्जाराणी** : बरं...बरं.. आधी सांग तरी काय हवंय ते.

**मोहन** : तू आमच्यावर कधी रागावणार नाहीस, नव्या नव्या रूपात तू नेहमी आमच्या मदतीला येशील, हे वचन हवंय आम्हांला.

**ऊर्जाराणी** : छान! म्हणजे आधी तुम्ही सगळा नाश करायचा आणि मग माझ्या मदतीसाठी धावा करायचा. असंच ना? नाही, तसं काही वचन मी देणार नाही...

**सुमन** : असं काय ग ऊर्जाराणी!

**ऊर्जाराणी** : वचनाचं राहू दे. पण ही सुंदर पृथ्वी अशीच सुंदर ठेवण्याचं काम तुम्ही मनापासून करणार असाल तर तुम्हांला काही उपाय मात्र मी सुचवीन.

**मोहन** : सांग, सांग. बघ आम्ही तुझं ऐकतो की नाही.

**ऊर्जाराणी** : सांगू? मग सुमन, मोहन तुम्ही दोघं अगदी कान देऊन ऐका. या पृथ्वीवरचे तेलाचे साठे संपून जातील. पृथ्वीच्या पोटातला कोळसा फार काळ पुरणार नाही.

**सुमन** : म्हणजे आमचे कारखाने बंद पडतील. उद्योगधंदे थांबतील.

**ऊर्जाराणी** : हे सगळं होऊ नये असं तुम्हांला वाटत असेल तर तुम्हांला खूप प्रयत्न करावे लागतील.

मोहन : आम्ही नक्की करू. काय करायचं ते सांग तरी.

ऊर्जाराणी : पहिली गोष्ट म्हणजे, आहे ती ऊर्जा तुम्ही काटकसरीनं वापरायची.

सुमन : आणि दुसरी गोष्ट कोणती?

ऊर्जाराणी : दुसरी गोष्ट म्हणजे ऊर्जा वाचवायची. आपल्याला जरूर नाही त्या गोष्टींसाठी ऊर्जा वापरायची नाही.

मोहन : आणि तिसरी गोष्ट?

ऊर्जाराणी : सूर्यापासून तुम्हांला मिळणाऱ्या प्रचंड ऊर्जेचा जास्तीत जास्त उपयोग करून घ्यायला तुम्ही शिकायचं. आणखी एक गोष्ट सांगू?

मोहन, सुमन : सांग...सांग!

ऊर्जाराणी : तुमच्या देशात खूप जनावरं आहेत. त्यांच्यापासून मिळणाऱ्या शेणाचं तुम्ही काय करता?

मोहन : लोक ते जळणासाठी वापरतात.

ऊर्जाराणी : होय ना. मग ते तसं वापरणं तुम्ही बंद करून टाकायचं. या शक्तीचा उपयोग तुम्हीच शोधून काढलेल्या गोबरगॅससाठी केला तर काय होईल?

मोहन : ठाऊक आहे. या पद्धतीनं घरगुती जळणासाठी गॅस तर मिळेलच आणि त्याचबरोबर उरलेल्या शेणाचा जमिनीला खत म्हणूनही उपयोग होईल. आमच्या गावात आहे गोबरगॅस.

ऊर्जाराणी : आहे ना? मग फारच छान. पण याचा वापर आणखी वाढायला हवा. सूर्यापासून तर तुम्हांला ऊर्जेची केवढी मोठी देणगी मिळत असते.

सुमन : होय... होय... आमच्या देशात सगळीकडेच खूप वेळ सूर्यप्रकाश मिळतो.



**ऊर्जाराणी** : खूप वेळ आणि खूप दिवस. वर्षातले जवळजवळ दहा महिने सूर्यापासून मिळणाऱ्या या शक्तीकडं म्हणावं तसं लक्ष तुम्ही देत नाही.

**मोहन** : खूप ऊन, खूप प्रकाश आम्ही वाया घालवतो!

**ऊर्जाराणी** : नाही तर काय! सूर्यापासून जी काही शक्ती पृथ्वीवर येते ना, त्या शक्तीचा फक्त दोन टक्के भाग झाडाझुडपांसाठी, वनस्पतींसाठी उपयोगात येतो. बाकीची सर्व शक्ती पृथ्वीवर पसरून वाया जाते. आणखी एक गणित सांगू?

**सुमन** : सांग, सांग. गणिताला काही आम्ही कंटाळणार नाही. मघाचं गणित खूप सोपं होतं नाही का रे मोहन?

**मोहन** : होयना. ऊर्जाराणीचं आताचं गणितदेखील सोपंच असणार.

**ऊर्जाराणी** : सूर्यापासून फक्त अर्ध्या तासात जेवढी शक्ती पृथ्वीवर येते ना, ती तुम्ही नीट वापरलीत तरी वर्षभर तुम्हांला जेवढी ऊर्जा लागते तेवढी तुम्ही सहज मिळवू शकाल!

**मोहन** : खरं की काय?

**सुमन** : तर मग आपण सूर्यशक्तीच्याच पाठीमागं लागायला हवं.

**ऊर्जाराणी** : अगदी बरोबर. तेच तुम्ही करायला हवं. शिवाय सूर्यापासून मिळणारी शक्ती म्हणजे निसर्गानंच तयार केलेली गोष्ट.

**मोहन** : हे अगदी खरं. सूर्यशक्ती वापरली तर पृथ्वीवरील जीवनात समतोल निर्माण होईल.

**ऊर्जाराणी** : सूर्यशक्तीवर चालणारी यंत्रं, विजेऱ्या, कुकर, पाणी तापवणारा बंब, सूर्यचूल आणि वीज निर्माण करणारे घट यांचा उपयोग तुम्ही जास्त वाढवलात तर तुमचाच फायदा होईल.

**सुमन** : मग इंधनासाठी झाडं तोडायला नकोत!

**मोहन** : जमिनीतून खोलवरचा कोळसा, तेल भरमसाट काढायला नको.

**सुमन** : सगळ्यांची गरज मग खूपच कमी होईल, नाही का ऊर्जाराणी?

**ऊर्जाराणी** : होयना! आणि मग तुमची पृथ्वी झाडांनी हिरवीगार, टवटवीत राहील. झाडांमुळे हवा चांगली राहील. फळाफुलांची लयलूट होईल. पाऊस पडेल. जमीन कसदार होईल. एक ना दोन — फायदेच फायदे होतील.

**मोहन** : खरंच किती छानदार वाटेल ते जग.

**सुमन** : होय ऊर्जाराणी, असं सुंदर जगच आम्हांला हवं. त्यासाठी सूर्यशक्तीचा उपयोग तर आम्ही करूच, शिवाय...

**मोहन** : जिथं जिथं शक्य असेल तिथं वाऱ्यापासून मिळणाऱ्या शक्तीचाही उपयोग आम्ही करू.

**ऊर्जाराणी** : छान, छान. म्हणजे तुम्ही पवनचक्क्या उभ्या करणार आणि त्यापासून वीज मिळवणार असंच ना?

**मोहन**
**सुमन** } : हो असंच!

**ऊर्जाराणी** : मोहन, सुमन तुम्ही हुशार माणसं आहात. संकटं आली की तुम्ही मार्ग काढता हेच खरं.

**सुमन** : आणि तरीही तू आमच्यावर रागावतेस.

**ऊर्जाराणी** : तुमच्यावर कितीही रागवायचं ठरवलं ना तरी माझा राग काही फार काळ टिकत नाही. बरं मोहन, ऊर्जा मिळवण्याचे आणखीही काय मार्ग आहेत सांगू शकशील?

**मोहन** : हो, कचऱ्यापासून ऊर्जा मिळवता येते.

**सुमन** : हिरव्या वनस्पतींपासून देखील ऊर्जा मिळते.

**ऊर्जाराणी** : शाबास!

**मोहन** : थांब ऊर्जाराणी, अजून हे मार्ग संपले नाहीत म्हटलं. अजूनही एक मार्ग आहे.

**ऊर्जाराणी** : तो कोणता?

**मोहन** : समुद्राच्या लाटांपासून देखील ऊर्जा मिळते.

**सुमन** : मलापण एक ठाऊक आहे, सांगू?

**ऊर्जाराणी** : *(हसून)* सांग पाहू.

**सुमन** : पृथ्वीच्या पोटात लपलेली उष्णता! मी वाचलंय पुस्तकात.

**ऊर्जाराणी** : बरोबर. मला प्रसन्न करून घेण्याचे खूप मार्ग तुम्हांला ठाऊक आहेत तर. पण एक गोष्ट लक्षात ठेवायची बरं का!

**मोहन**
**सुमन** } : ती कोणती?

**ऊर्जाराणी** : मला मिळवण्यासाठी तुमच्या सुंदर निसर्गावर तुम्ही अन्याय

करायचा नाही. तसं तुम्ही केलंत तर मी प्रसन्न तर होणार नाहीच, पण एखादे वेळी तुम्हांला शापदेखील देईन.

**मोहन** : ऊर्जाराणी...ऊर्जाराणी, बघ तू रागावलीस.

**सुमन** : खरंच ऊर्जाराणी, तू रागावू नकोस.

**मोहन** : आम्ही तुला वचनच देतो.

**ऊर्जाराणी** : वचन? ते कोणतं?



**सुमन** : होय खरंखुरं वचन, जुन्या कहाणीतल्यासारखं.

**सुमन**
**मोहन** } : आम्ही उतणार नाही, मातणार नाही! निसर्गाचा बळी देणार नाही! अशीच असेल आमची करणी! प्रसन्न होवो ऊर्जाराणी!

**ऊर्जाराणी** : *(हसून)* तथाऽस्तु!

**प्रश्न :**

**अ.** १. आज ऊर्जा कोणकोणत्या स्वरूपांत आढळते?

२. जळण म्हणून लाकूड वापरल्याने कोणते नुकसान होते?

३. ऊर्जा बचतीसाठी काय केले पाहिजे?

४. सूर्यशक्तीचा कोणकोणत्या प्रकारे उपयोग करता येईल?

**आ.** वाक्यांत उपयोग करा.

वाळवंट होणे, वचन देणे, लयलूट होणे.

**इ.** खालील शब्दांबद्दल पर्यायी शब्द लिहा.

इंधन, सोबत, विध्वंस, गोबर, मार्ग.

**ई.** गोबरगॅस प्लँट आणि सूर्यचूल यांविषयी माहिती मिळवा.

**उ.** शासन, काही गावांना 'ऊर्जाग्राम' म्हणून घोषित करते. त्यासंबंधी माहिती मिळवा.

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. हे लक्षात ठेवा.

- पाण्याची टाकी, हौद, भांडे पाण्याने भरल्यानंतर नळ लगेच बंद करा.
- रात्री झोपताना घरातील आवश्यक तितकेच दिवे चालू ठेवा.
- गॅसचा वापर संपल्यानंतर गॅस सिलेंडरचे बटन बंद करा.

**व्याकरण :**

१. तुझं नाव तर आज पहिल्यांदाच ऐकतोय मी.

२. ऊर्जेची गरज खूपच कमी होईल.

वरील वाक्यांत पहिल्यांदाच, खूपच हे शब्द त्या त्या वाक्यातील क्रिया किती वेळा किंवा किती प्रमाणात घडली हे दाखवतात. अशा संख्या किंवा परिमाण दाखवणाऱ्या शब्दांना **संख्यावाचक** किंवा **परिमाणवाचक क्रियाविशेषणे** म्हणतात.

खालील वाक्यांतील अशी विशेषणे शोधा व लिहा.

१. मी त्यांच्या घरी एकदाच गेलो.

२. साहेबाने शंभरदा बजावले तरी मी एकदाही ऐकले नाही.



# १२. थोर स्वातंत्र्यसेनानी

**ग. प्र. प्रधान (गणेश प्रभाकर प्रधान)** — शिक्षणतज्ज्ञ व संपादक. सामाजिक कार्यकर्ते. 'हाजीपीर', 'सोनार बांगला', 'साता उत्तराची कहाणी' ही यांची गाजलेली पुस्तके.

प्रस्तुत पाठात थोर देशभक्त सुभाषचंद्र बोस यांनी स्वातंत्र्यासाठी केलेल्या संग्रामाचे प्रभावी दर्शन घडते.

नेताजी सुभाषचंद्र बोस हे भारताच्या स्वातंत्र्य संग्रामातील एक थोर सेनानी. कुशाग्र बुद्धिमत्ता, प्रखर देशभक्ती आणि अलौकिक त्याग ही त्यांची वैशिष्ट्ये. सुभाषबाबू हे तरुणांचे आवडते नेते होते. त्यांचे व्यक्तिमत्व प्रसन्न होते. त्यांचे वक्तृत्व अमोघ होते. त्यांचे भाषण ऐकताना लोक मंत्रमुग्ध होत. भारत स्वतंत्र व्हावा हाच एक ध्यास त्यांना होता. विद्यार्थी असतानाच ते



स्वातंत्र्य चळवळीत भाग घेऊ लागले. त्यांना अनेक वेळा तुरुंगवास भोगावा लागला. स्वातंत्र्याचे ध्येय साध्य होण्यासाठी त्यांनी सर्वस्व अर्पण केले.

सप्टेंबर १९३९ मध्ये दुसरे महायुद्ध सुरू झाले आणि सुभाषबाबूंनी स्वातंत्र्याचा क्षण समीप आला आहे, अशा आशयाचे एक भाषण कोलकत्यात केले. ब्रिटिश सरकारने या त्यांच्या जहाल भाषणाबद्दल त्यांच्यावर खटला भरून त्यांना तुरुंगात टाकले. तुरुंगात असताना सुभाषचंद्र बोस यांनी २६ नोव्हेंबरला बंगालच्या गव्हर्नरांना पत्र लिहून, २८ नोव्हेंबरपासून आपण आमरण उपोषण करणार आहोत असे कळवले. याच वेळी आपल्या देशबांधवांना उद्देशून त्यांनी एक पत्र लिहिले. त्यात ते म्हणतात, 'गुलाम म्हणून जगत राहणे हा सर्वांत मोठा शाप आहे. कितीही किंमत द्यावी लागली तरी पारतंत्र्याविरुद्ध लढा देणे हा सर्वांत मोठा मानवी सद्गुण आहे, हे कधीही विसरू नका.'

गव्हर्नरला पाठवलेल्या पत्रात लिहिल्याप्रमाणे सुभाषबाबू उपोषण करून बलिदान करतील आणि त्याचे गंभीर परिणाम होतील असे वाटल्यामुळे, सरकारने त्यांना तुरुंगातून सोडून दिले आणि त्यांच्या कोलकत्यातील घरी स्थानबद्ध करून ठेवले. त्यांच्या घराभोवती अहोरात्र सशस्त्र शिपायांचा कडेकोट पहारा बसवण्यात आला. सुभाषबाबूंनी पूर्ण एकांतवासात राहायचे ठरवले. कोणीही आपल्याला भेटू नये, असे आपल्या कुटुंबीयांनाही सांगितले. त्यांचे जेवण त्यांच्या खोलीच्या बाहेरच दरवाजाजवळ ठेवण्यात येऊ लागले.

सुभाषबाबूंच्या वरील खटल्याबाबत त्यांना भेटण्यासाठी त्यांचे वकील २६ जानेवारी, १९४१ ला सायंकाळी त्यांच्या घरी आले. त्यांनी प्रथम खोलीच्या दारावर टकटक केले, नंतर दार जोरात ढकलले. दार उघडले; परंतु सुभाषबाबू आत नव्हते. ते कोठे गेले कोणालाच समजेना. दुसऱ्या दिवशी सर्व वर्तमानपत्रांतून ठळक बातमी आली — 'सुभाषबाबूंचे काय झाले? घरातून अनपेक्षितपणे प्रयाण.' देशभर प्रचंड खळबळ उडाली. गांधीजी आणि

रवींद्रनाथ टागोर यांनी सुभाषबाबूंचे बंधू शरच्चंद्र बोस यांना तारा करून सुभाषबाबूंबद्दल गंभीर चिंता व्यक्त केली आणि ते सुरक्षित असोत अशी इच्छा प्रकट केली. सुभाषबाबूंच्या घराभोवती पोलिसांचा सतत पहारा असताना ते निसटून कसे गेले, याचा सरकारी अधिकाऱ्यांना थांगपत्ताही लागेना.

ब्रिटिश सरकारने ताबडतोब सुभाषबाबूंचा शोध सुरू केला. भारताची पूर्व सीमा बंद करून टाकली; परंतु सुभाषबाबूंनी कोलकता केव्हाच सोडले होते. ते भारताच्या पश्चिम सीमेकडे गेले होते. १५ जानेवारीला संध्याकाळी लुंगी नेसून सुभाषबाबू घराबाहेर पडले होते. त्यांनी दाढी वाढवली होती, चष्मा काढून ठेवला होता, त्यामुळे ते जराही ओळखू येत नव्हते. पोलिसांना त्यांचा संशयही आला नाही. सुभाषबाबू घरातून बाहेर पडले, ते त्यांचे भाऊ शरच्चंद्र बोस यांच्या घरी गेले. १७ जानेवारीस मध्यरात्र उलटल्यावर त्यांनी कोलकता शहर सोडले. त्यांचा पुतण्या शिशिर बोस याने त्यांना मोटारीतून गोमोह या रेल्वे स्टेशनवर नेले. तेथे सुभाषबाबू पेशावरकडे जाणाऱ्या आगगाडीत बसले आणि १९ जानेवारीला वायव्य सरहद्द प्रांतातील पेशावर येथे जाऊन पोहोचले. उतरल्याबरोबर अकबर शहा या त्यांच्या मित्राने त्यांना एका सराईत नेले. सुभाषबाबूंना अफगाणिस्तानात नेण्याची जबाबदारी भगतराम तलवार यांनी घेतली होती. २७ जानेवारीला सुभाषबाबूंचा कष्टाचा प्रवास सुरू झाला. रात्रभर चालून ते भगतराम तलवार यांच्याबरोबर टोळीवाल्यांच्या प्रदेशात गेले. ते ३१ जानेवारीला अफगाणिस्तानात काबूलला पोहोचले.

सुभाषबाबूंचा रशियाला जाण्याचा बेत होता, परंतु तो यशस्वी झाला नाही. इटालिअन राजदूताच्या मदतीने ते जर्मनीत बर्लिनला गेले. अनेक अडचणींना तोंड देत तेथे त्यांनी आझाद हिंद रेडिओचे स्वतंत्र केंद्र स्थापन केले. या रेडिओ केंद्रावरून त्यांनी भारतीयांना उद्देशून एक अत्यंत प्रभावी व

स्फूर्तिदायी भाषण केले. स्वाभिमान न गमावता त्यांनी जर्मनीची मदत मिळवली.

१९४१ च्या डिसेंबर महिन्यात जपान महायुद्धात उतरला. सिंगापूरचा पाडाव झाला आणि ब्रिटिश सेना पराभूत होऊन झपाट्याने माघार घेऊ लागली. हजारो भारतीय सैनिकांना जपानने युद्धकैदी म्हणून पकडले आहे, असे सुभाषबाबूंना समजले. त्या वेळी या भारतीय सैनिकांशी संपर्क साधून भारताच्या स्वातंत्र्यासाठी त्यांना लढण्यास लावायचे असा सुभाषबाबूंनी निश्चय केला. यासाठी त्यांनी जपानला जाण्याचे ठरवले. बोटीने अगर विमानाने प्रवास करणे अशक्य होते. त्यामुळे पाणबुडीतून प्रवास करायचे त्यांनी ठरवले. वाटेत पाणसुरुंग पेरलेले असल्यामुळे जिवाला धोका होता; परंतु सुभाषबाबूंनी हा धोका पत्करला. अबीद हसन या आपल्या विश्वासू सहकाऱ्यासह त्यांनी जर्मनीपासून जपानपर्यंत तीन महिने पाणबुडीने प्रवास केला. नंतर जर्मन पाणबुडीतून उतरून एका रबरी होडीने सुभाषबाबू व अबीद हसन जपानी पाणबुडीकडे निघाले. समुद्राच्या लाटा पर्वतासारख्या उसळत होत्या. ते नखशिखान्त ओले झाले होते. नाकातोंडात पाणी गेले होते. ते अबीद हसनसह जपानी पाणबुडीजवळ जाऊन पोहोचले. नंतर त्या दोघांना पाणबुडीत उचलून घेतले गेले. ६ मे, १९४३ ला सुभाषबाबू जपानमध्ये पाणबुडीने सेबान या गावी पोहोचले. त्यांच्या या साहसाला भारताच्या स्वातंत्र्यलढ्यात मोलाचे स्थान आहे.

यानंतर जपानने पकडलेल्या भारतीय सेनाधिकाऱ्यांशी व सैनिकांशी सुभाषबाबूंनी संबंध जोडले. विश्वासू सहकाऱ्यांची निवड करून महत्त्वाचे निर्णय झटपट घेतले. २५ ऑगस्ट, १९४३ ला सुभाषचंद्र बोस यांनी 'आझाद हिंद फौजेचे नेतृत्त्व स्वीकारले आणि या सेनेला उद्देशून 'चलो दिल्ली' ही स्फूर्तिदायी घोषणा केली. आझाद हिंद सेनेचा एक भाग म्हणून सुभाषबाबूंनी स्त्रियांचीही एक पलटण उभी केली व तिला १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धातील रणरागिणी झाशीची राणी लक्ष्मीबाई हिचे नाव दिले.



२१ ऑक्टोबर, १९४३ ला सुभाषबाबूंनी 'आझाद हिंद सरकार'ची स्थापना केली. त्या सरकारचे ते पंतप्रधान झाले, त्याचबरोबर ते आझाद हिंद सेनेचे सरसेनापतीही झाले. सैनिकांच्या मेळाव्यात राष्ट्रध्वज फडकवताना सुभाषबाबूंनी जे स्फूर्तिदायक भाषण केले, त्या भाषणात गांधीजींचा आदरपूर्वक उल्लेख करून ते म्हणाले, 'भारताच्या स्वातंत्र्यासाठी सुरू केलेल्या या पवित्र संग्रामात आम्ही आपले आशीर्वाद मागतो.'

आझाद हिंद सरकारचे प्रमुखपद स्वीकारल्यावर सुभाषचंद्र बोसांनी पुढील शपथ घेतली — 'मी सुभाषचंद्र बोस, परमेश्वरास स्मरून अशी पवित्र शपथ घेतो, की मी भारतभूमीची आणि माझ्या देशबांधवांची गुलामगिरीतून मुक्तता करीन. माझ्या अखेरच्या श्वासापर्यंत स्वातंत्र्यासाठी सुरू केलेले हे

पवित्र युद्ध निष्ठेने चालवीन.' या प्रतिज्ञेप्रमाणे सुभाषबाबू आयुष्याच्या अखेरच्या क्षणापर्यंत भारताच्या स्वातंत्र्यासाठी लढत राहिले.

देशगौरव सुभाषचंद्र बोस यांना शतशः प्रणाम!

**प्रश्न :**

**अ.** १. सुभाषचंद्र बोस यांच्या ठिकाणी कोणकोणते गुणं होते?

२. सुभाषबाबूंना सरकारने स्थानबद्ध का केले?

३. भारत स्वतंत्र व्हावा,म्हणून सुभाषचंद्र बोस यांनी कोणत्या हालअपेष्टा भोगल्या?

**आ.** टिपणे लिहा.

१. आझाद हिंद फौज

२. सुभाषबाबूंचे वेशांतर

३. अबीद हसन

**इ.** शब्दांचे अर्थ खाली दिलेले आहेत. पाठातून ते मूळ शब्द शोधा व लिहा.
अतिशय तीक्ष्ण बुद्धी, प्रभावी बोलणे, स्फूर्ती निर्माण करणारे.

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. स्वातंत्र्यासाठी लढलेल्या दोन थोर पुरुषांची माहिती थोडक्यात लिहा.

२. छत्रपती शिवरायांची 'आग्र्याहून सुटका' आणि स्वातंत्र्यवीर सावरकरांची 'फ्रान्सच्या समुद्रातील उडी' हे दोन प्रसंग माहीत करून घ्या व त्याबद्दल वर्गामध्ये भाषण करा.

**व्याकरण :**

रामाने रावणाला मारले.

वरील वाक्यात 'रामाने', 'रावणाला' या शब्दांत 'ने, ला' या प्रत्ययांनी क्रियापदांशी त्या नामांचा असलेला संबंध दर्शवलेला आहे.

वाक्यांत येणारे शब्द क्रियापदांशी किंवा इतर शब्दांशी संबद्ध असतात. हा संबंध म्हणजेच **विभक्ती** होय, आणि ते दर्शवणाऱ्या प्रत्ययांना **विभक्ती प्रत्यय** म्हणतात.





# १३. सुईचे आत्मवृत्त

सुई ही आपल्या रोजच्या उपयोगाची वस्तू. दिसते एवढीशी, पण ती तयार व्हायची म्हणजे किती कष्टाचे काम आहे! सुई स्वतःच आपली सारी हकीगत राम नावाच्या एका मुलाला सांगत आहे, अशी कल्पना करून पुढील पाठ लिहिलेला आहे.

राम शब्दार्थाची वही शिवत बसला होता. शिवण्याचे काम झाल्यावर त्याने निष्काळजीपणाने सुई तशीच जमिनीवर पडू दिली आणि तेथून उठून तो दुसऱ्या कामाला गेला. सुई उचलून जागच्या जागी ठेवण्यास तो साफ विसरला.

संध्याकाळी शाळेतून आल्यावर तो आपल्या खोलीत पाटीदप्तर ठेवून खेळायला जाऊ लागला, तेव्हा 'आईऽऽ आई ग!' असे तो एकदम ओरडला आणि पाहतो तो पायाला सुई बोचलेली! त्याने ती हळूच पायातून काढली. पण त्याला तिचा इतका राग आला, की ती सुई दगडाने ठेचून टाकावी असे त्याला वाटले; म्हणून तो दगड शोधू लागला. त्याचा तो राग पाहून सुईला वाटले, की आता हा आपली चांगलीच कंबक्ती काढील; पण याला दोन गोष्टी सांगून तर पाहू! शहाणा असेल तर समजेल आणि आपल्यावरचे संकट टळेल; म्हणून ती त्याला हलक्या स्वराने म्हणाली, ''भाऊ, माझ्यामुळं तुला दुःख झालं याबद्दल मला फार वाईट वाटतं. कारण होता होईल तो दुसऱ्याच्या उपयोगी पडावं आणि आपण होऊन कोणाच्या वाटेस जाऊ नये हा माझा स्वभाव आहे; पण तू माझ्यावर पाय देऊन मला चेंगरून टाकू लागलास, तेव्हा माझा निरुपाय झाला. मी सकाळी वही शिवण्याच्या कामी तुला किती मदत केली होती,

हे तू इतक्यात विसरलास काय? मी तुझ्या उपयोगी पडले असून तू मला तशीच मातीत लोळत ठेवून उठून गेलास, ही चूक कोणाची? मला तुझ्यासारखे दोन पाय, दोन हात नाहीत. त्या बाबतीत मी अगदी पंगू आहे, हे तुला ठाऊक होतं. मग तू काम झाल्याबरोबर मला नेहमीच्या जागी नीट, व्यवस्थित ठेवलं असतंस तर हा प्रसंग का येता? तुला दोन डोळे दिले आहेत. असं असून तू त्यांचा नीट उपयोग करत नाहीस, म्हणून तुला ही शिक्षा मिळाली! मग माझ्यावर उगाच का रागावतोस?''

रामच्या अंगी निष्काळजीपणाची सवय जडलेली होती; पण तो बुद्धीने चलाख, समजदार आणि मनाचा कोवळा होता. सुईचे बोलणे ऐकून ही सगळी आपलीच चूक आहे; त्याबद्दल तिला बिचारीला काय म्हणून शिक्षा करायची? असे त्याचे मन त्याला सांगू लागले. त्याचा राग शांत झाला. इतकेच नव्हे, तर त्याला आपल्या रागाची शरमही वाटू लागली. हे पाहून सुईला त्याच्याशी अधिक बोलण्याला उत्तेजन मिळाले. ती म्हणाली, ''भाऊ, तुझ्या मनाला वाईट वाटू देऊ नकोस. तुझा पाय पडल्यानं मला मोठीशी इजा झाली नाही आणि झाली असती तरी तिचं .मला एवढं वाईट वाटलं नसतं; कारण मी जन्मापासून कष्ट सोशीत आले आहे. मला काय काय दुःखं भोगावी लागली हे तू ऐकशील तर तुझ्या डोळ्यांतून टिपं गळतील; तरीपण मी आपली कहाणी तुला सांगतेच. मनातलं दुःख दुसऱ्याला सांगितल्यानं सांगणाऱ्याला हलकं वाटतं.

माझा जन्म लोहकुळात झाला. आमचं घर पृथ्वीच्या पोटात होतं. तिथं आम्ही सुखानं पडून होतो; पण माणसं फार लोभी आणि अप्पलपोटी! त्यांनी जमीन खणून आम्हांला वर काढलं व भट्टीत घातलं, तेव्हा आमच्या अंगाचं पाणी पाणी झालं; त्यामुळं आमचं शरीर पूर्वीपेक्षाही बळकट झालं आणि लोकांच्या उपयोगी पडण्याचं सामर्थ्य आम्हांला प्राप्त झालं. मी जर पोलाद न बनता पूर्वीसारखी लोखंडच राहते, तर टाचणीसारखं माझं अंग वाकलं असतं आणि माझं टोक झिजलं असतं. तुला आता दिसते तशी

मी अगोदर अंगानं बारीक नव्हते. खूप जाड होते. माणसांनी घणानं ठोकून ठोकून आणि बारीक भोकातून जोरानं ओढून काढून तारेसारखं माझं अंग बारीक केलं. मी तुझ्यासारखी भूगोल शिकलेली नाही, त्यामुळे हे सगळं कुठं घडलं ते मला नक्की सांगता येणार नाही. पण सर्वप्रथम विलायतेत लंडनजवळ शेफील्ड नावाचं एक शहर आहे, तिथं हे सगळं घडलं असं मला स्मरतं. असो.

मला ओढून काढल्यामुळं माझं शरीर बारीक पण खूप लांब झालं. मग माझ्या शरीराचे लहान लहान तुकडे करण्यात आले आणि त्या प्रत्येक तुकड्याचं डोकं थोडं चपटं करून त्याला यंत्रानं भोक पाडण्यात आलं. तेच माझं नाक. याला नेढं म्हणतात. तसंच माझा एकच पाय, पण तोही माणसांनी धड राहू दिला नाही. यंत्रानं फिरणाऱ्या दगडी चाकावर घासून घासून त्याला अणकुचीदार टोक आणलं. इतकं झाल्यावर मग आम्ही झकपक दिसावं म्हणून आमच्या अंगावर झिलई चढवण्यात आली आणि कागदात गुंडाळून आम्हांला बाजारात विकण्यासाठी नेण्यात आलं. तेथून तू मला आपल्या घरी आणून तुझ्या आईच्या स्वाधीन केलंस. इतके कष्ट सोसले म्हणून मला तुझ्या उपयोगी पडता आलं. आता तूच पाहा बरं, की मी तुझ्या किती उपयोगी पडते आहे! तुझ्या वह्या व अंगातला सदरा, कोट वगैरे कपडे मी शिवून देते व तुझ्या पायात काटा मोडला असला तर तोही मी काढते.

मी अगदी साधी वस्तू आहे. मला फारशी किंमत द्यावी लागत नाही. पंचवीस पैशांत माझ्यासारख्या दोन-तीन सुया सहज मिळतात. पण मी तुझ्या फार उपयोगी पडते ही गोष्ट खरी! मला आळसानं पडून राहणं आवडत नाही. मला नेहमी कामाला लावलं म्हणजे मी झकपक राहते आणि खूप काम करून दाखवते. आळसाने मातीत लोळू दिलं, तर मी काळवंडून निरुपयोगी होते.

ही माझी कहाणी मी आज तुला सांगितली आहे. आता तरी तू मला नीट जपून वागव. इकडे तिकडे फेकून देऊ नकोस, म्हणजे आजच्यासारखा तुला टोचण्याचा व त्यामुळं रागावण्याचा प्रसंग येणार नाही.''

**प्रश्न :**

**अ.** १. रामला आपली चूक केव्हा समजून आली?

२. सुई कोणत्या वस्तूपासून कसकशी तयार होते?

३. सुई कोणकोणत्या कामी उपयोगास येते?

**आ.** एका वाक्यात कारण लिहा.

१. राम,'आई ऽ ऽ आई ग'! असे ओरडला.

२. राम दगड शोधू लागला.

३. सुई जपून हाताळावी.

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. नदीचे आत्मवृत्त लिहा.

२. 'मनातील दुःख दुसऱ्याला सांगितल्यानं सांगणाराला हलकं वाटतं' या विधानाचा प्रत्यय आणणारी तुमच्या जीवनातील एक घटना लिहा.

३. कंबक्ती काढणे, निरुपाय होणे, अंगाचे पाणी पाणी होणे या शब्दप्रयोगांचा उपयोग करून प्रत्येकी एक वाक्य लिहा.

४. या पाठाचे, राम व सुई या दोघांमधील संवादात रूपांतर करा.

५. 'कृपा' या नामापासून 'कृपाळू' असे विशेषण बनते. दया, माया, कष्ट या नामांपासून विशेषणे तयार करा व त्यांचा वाक्यांत उपयोग करा.

६. तुम्ही यांचे अनुकरण करा.

- दिलीप कागदाच्या दोन्ही बाजूंनी लिहितो.
- उमा गणिते सोडवताना पाटीचा वापर करते.
- गणेश पुस्तकांना कव्हर घालतो.
- नंदू पुस्तकाची पाने फाटू नयेत म्हणून काळजी घेतो.
- लिहिताना एखाद्या शब्दात खाडाखोड झाल्यावर सुमन वहीचे पान फाडत नाही.

**व्याकरण :**

वाक्यातील शब्दांचे क्रियापदांशी व इतर शब्दांशी असलेले संबंध दाखवणारी अक्षरे म्हणजे त्या शब्दांना लागणारे प्रत्यय होत.

हे प्रत्यय विभक्तीचे अर्थ दाखवतात.

विभक्तीचे प्रत्यय पुढीलप्रमाणे आहेत.

| विभक्ती | एकवचन-प्रत्यय | अनेकवचन-प्रत्यय |
|---|---|---|
| प्रथमा | — | — |
| द्वितीया | स, ला, ते | स, ला, ना, ते |
| तृतीया | ने, ए, शी | नी, ही, ई, शी |
| चतुर्थी | स, ला, ते | स, ला, ना, ते |
| पंचमी | ऊन, हून | ऊन, हून |
| षष्ठी | चा, ची, चे | चे, च्या, ची |
| सप्तमी | त, इ, आ | त, इ, आ |
| संबोधन | — | नो |





# १४. कृष्णामाई

**काका कालेलकर (द. बा. कालेलकर)** — सुप्रसिद्ध गांधीवादी. मराठी, हिंदी, इंग्रजी व गुजराती या भाषांतून अनेक ग्रंथ लिहिले. 'हिंडलग्याचा प्रसाद', 'वनशोभा', 'खेळकर पाने', 'जीवनलीला' इत्यादी पुस्तके यांनी लिहिली.

'कृष्णामाई' हा पाठ 'जीवनलीला' या पुस्तकातून घेतला आहे. या पाठात कृष्णा नदी व तिचा परिसर यांचे रोचक वर्णन आढळते.

एकादशीचा दिवस होता. गाडीत बसून आम्ही माहुलीला निघालो. सातार्‍याहून माहुली चांगलीच दूर आहे. रस्त्यात उजव्या बाजूस श्री शाहू महाराजांच्या इमानदार कुत्र्याची समाधी दिसते. आमच्याप्रमाणेच पुष्कळांनी गाड्या माहुलीकडे भरधाव सोडल्या होत्या. शेवटी आम्ही नदीकाठी पोहोचलो. तेथे या काठापासून त्या काठापर्यंत लोखंडाचा दोरखंड उंचावर ताणून बांधला होता. माझ्या बालदृष्टीला भव्य भासणारी एक नौका त्या दोरखंडाला साखळीने बांधलेली होती.

तीरावरील गोटे कसे गुळगुळीत, काळे आणि थंडगार! एक हातात घेतला न घेतला तोच दुसर्‍यावर नजर पडे. तो अधिक चांगला वाटे. इतक्यात तिसर्‍या भिजलेल्या गोट्यावर उदी रंगाच्या रेघा दिसत म्हणून तो घेण्याची इच्छा होई. त्या दिवशी मला कृष्णेचे पहिले दर्शन घडले. कृष्णामाईने मला पहिल्या भेटीतच ओळखले. कृष्णेला मी ओळखावे इतका मोठा मी त्या वेळी झालोच नव्हतो. मूल आईला ओळखू लागते त्यापूर्वीच आईने त्याला आपलेसे केलेले असते. आम्ही मुले पाण्यात मनसोक्त डुंबलो, पाणी उडवले, नौकेवर चढून पाण्यात उड्या मारल्या. कडकडून भूक लागेस्तोवर कृष्णेत यथेच्छ जलविहार केला.

अंघोळ केल्यावर खाऱ्या शेंगदाण्यांची न्याहारी केली, तो स्वाद त्या प्रकारचा पहिलाच होता. यात्रेच्या वेळी मोरपिसांचा टोप घालणारे वासुदेव आले होते. टाळांच्या साथीवर गायलेले त्यांचे मधुर भजनही त्याच दिवशी पहिल्या प्रथम ऐकले. कृष्णामाईच्या मंदिरात थोडा वेळ आराम करून आम्ही घरी परतलो.

सह्याद्रीच्या अरण्यात महाबळेश्वराजवळ उगम पावून साताऱ्यापर्यंत धावत येण्यास कृष्णेला फारसा वेळ लागत नाही. पण तितक्यातच वेण्णा कृष्णेला भेटण्यास येते. माहुलीला जे माहात्म्य लाभले आहे ते या संगमामुळेच. दोन मुली एकमेकींच्या खांद्यावर हात ठेवून खेळायला निघाल्या आहेत असे हे दृश्य काही नाही तरी पस्तीस वर्षे, हृदयात कोरलेले आहे.

कृष्णेचे कुटुंब भलेमोठे आहे. कितीतरी लहानमोठ्या नद्या तिला येऊन मिळतात. गोदावरीप्रमाणेच कृष्णेलाही महाराष्ट्रमाता म्हणता येईल. ज्या काळी आजची मराठी भाषा प्रचलित नव्हती, त्या काळचा सारा महाराष्ट्र कृष्णेनेच व्यापून टाकला आहे.

नरसोबाच्या वाडीला जात असताना गाडी नावेवर चढवून आम्ही कृष्णा पार केली होती, ते कृष्णेचे दुसरे दर्शन. एका बाजूला उंच दरड आणि दुसऱ्या बाजूला दूरवर पसरलेला गाळाचा विस्तार व त्यात होणारी वांगी, काकड्या, कलिंगडे, टरबुजे यांचे अमृतमळे. कृष्णाकाठची ती वांगी ज्याने एकदा चाखली, की त्याला वारंवार खावीशी वाटतील. सतत एक-दोन महिने सारखी वांगीच खात राहिलो तरीही तृप्ती होणार नाही, मग वीट येणे तर दूरच राहिले.

श्री समर्थ व शिवाजीमहाराज, शाहू व बाजीराव, घोरपडे व पटवर्धन, नाना फडणवीस व रामशास्त्री — थोडक्यात सांगायचे म्हणजे महाराष्ट्राचे साधुत्व व वीरत्व, महाराष्ट्राची न्यायनिष्ठा व मुत्सद्दीपणा, धर्म व सदाचार, देशसेवा व विद्यासेवा, स्वतंत्रता व उदारता सारे काही कृष्णेच्या वत्सल कुटुंबात वाढले आहे. देहू आणि आळंदीचे पाणी कृष्णेलाच येऊन

मिळते. पंढरपूरला चंद्रभागा हे नाव धारण करणारी भीमा पुढे कृष्णेतच विलीन होते. 'गंगास्नान आणि तुंगापान' या म्हणीत जिचा गौरव स्वीकारला गेला आहे, ती तुंगभद्रा कर्नाटकाच्या प्राचीन वैभवाच्या स्मरणासहित कृष्णेतच मिसळून जाते. खरे सांगायचे म्हणजे महाराष्ट्र, कर्नाटक व आंध्र या तीन राज्यांचे ऐक्य साधण्यासाठीच कृष्णा वाहत आहे. हे तीनही प्रांत कृष्णेचे दूध प्याले आहेत. कृष्णेला प्रांतीयता ठाऊक नाही.

कृष्णेच्या पाण्यात कितीतरी आक्रमकांचे रक्त मिसळले असेल! पावसाळी उन्मादात कितीतरी शेतकऱ्यांना आणि त्यांच्या गुराढोरांना कृष्णेने जलसमाधी दिली असेल! पण कृष्णेला त्याचे काय होय? मदमत्त हत्तींनी तिच्या पाण्यात विहार केला काय किंवा वीतराग साधूंनी तिच्या काठी तपस्या केली काय — तिला दोन्ही सारखेच. वाईला ज्या कृष्णा नदीच्या काठी बसून मी संध्यावंदन केले आणि न्यायनिष्ठ रामशास्त्र्यांच्या व



राज्यकार्यधुरंधर नानांच्या गोष्टी ऐकल्या, तीच चिमुरडी कृष्णा येथे एवढी मोठी झालेली पाहून प्रथम तर डोळ्यांवर विश्वासच बसेना. कोठे ती माहुलीची लहानशी साखळी आणि कोठे हे येथले युरोप-अमेरिकेला जोडणाऱ्या केबलांसारखे जाडजूड दोरखंड! हजारो, लाखो लोक येथे स्नानाला येत. स्थूलकाय आंध्र बांधवांत आज भारतवर्षातील सारेच बांधव मिसळून गेले आहेत. 'राष्ट्रीय' हिंदीचा वाक्प्रवाह जेथे तेथे ऐकू येत आहे. कृष्णा नदीला जशा वेण्णा, वारणा, भीमा, तुंगभद्रा येऊन मिळतात, त्याचप्रमाणे खेड्यापाड्यांतून टोळ्यांटोळ्यांनी येऊन मिळणारा जनतेचा प्रवाह बेझवाड्यात उतू जाऊ लागला आहे. अशा प्रसंगी रोज कृष्णेत स्नान करण्याचा लाभ मिळत आहे. ज्या कृष्णेने जन्मकाळचे दूध दिले त्याच कृष्णेने भारतराष्ट्राचे गौरवशाली दर्शन घडवले. जय कृष्णे! तुझा विजय असो!



प्रश्न :

अ. १. या पाठात कृष्णा नदीची कोणती वैशिष्ट्ये आढळतात?

२. कृष्णेला प्रांतीयता ठाऊक नाही, असे का म्हटले आहे?

३. टिपणे लिहा.

राजर्षी शाहूमहाराज, श्रीसमर्थ, नाना फडणवीस.

आ. 'अ' गटात थोर व्यक्तींची नावे तर 'आ' गटात त्यांची खास वैशिष्ट्ये दिलेली आहेत. योग्य जोड्या लावा.

| अ | आ |
| --- | --- |
| श्रीसमर्थ | विद्यासेवा |
| राजर्षी शाहूमहाराज | मुत्सद्दीपणा |
| बाजीराव | न्यायनिष्ठा |
| नाना फडणवीस | साधुत्व |
| रामशास्त्री | वीरत्व |

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. 'नदी ही लोकमाता होय' या कल्पनेचे स्पष्टीकरण करा.

२. तुम्ही पाहिलेल्या नदीचे वर्णन दहा ओळींत लिहा.

**व्याकरण :**

विभक्तीचे प्रत्यय जोडताना नामाच्या मूळ रूपात बदल होतो.

जसे : घोडा + स = घोड्यास, मूल + ला = मुलाला, दिवा + ची = दिव्याची.

घोडा, मूल, दिवा या शब्दांची विभक्तिप्रत्यय जोडताना घोड्या, मुला, दिव्या अशी जी रूपे झाली त्यांना **सामान्यरूपे** असे म्हणतात.

खालील वाक्यांतील सामान्य रूपे सांगा.

१. दशरथाने धनुष्याला बाण लावला.

२. अस्वलाला झाडावर चांगले चढता येते.

३. त्याने कोल्हयाला खूण केली.



# १५. पावनखिंड

**रणजित देसाई —** कथाकार आणि कादंबरीकार. यांची 'स्वामी' कादंबरी विशेष गाजली.

पुढील पाठ हा त्यांच्या 'श्रीमान योगी' या कादंबरीतून घेतला आहे. श्री छत्रपती शिवाजीमहाराज यांच्या स्वराज्य स्थापनेच्या कार्यात बाजीप्रभूने पावनखिंडीत कसे हौतात्म्य पत्करले याचे हृदयस्पर्शी वर्णन या पाठात आले आहे.

राजे गडावरून निसटून गेल्याची खात्री होताच खानाच्या छावणीत गोंधळ उडाला. स्वतःचे कौतुक करून घेत बसलेला मसूद, आपण आणलेला शिवाजी खोटा शिवाजी आहे, हे कळताच हताश झाला. संतापाने त्याने पुन्हा फौज गोळा केली आणि मध्यरात्रीनंतर तो विशाळगडाच्या वाटेला लागला. सिद्दी जौहरला नक्की काही उमजत नव्हते. कदाचित खरा शिवाजी अजून गडावरच असेल, अशी शंका येऊन या गोंधळात विस्कळीत झालेला वेढा परत आवळून तो स्वतः गडाजवळच राहिला.

विशाळगडाच्या वाटेवर कुठेतरी पहाट होत होती. राजांची पालखी दौडीने पळवली जात होती. पालखीच्या पुढेमागे पळणारे वीर सारखी मागेपुढे नजर टाकत होते. वादळ कमी झाले होते; पण पाऊस होताच. राजे पालखीच्या गोंड्याला धरून पालखीत बसले होते. ऊर फुटेपर्यंत माणसे सारखी पळत होती. पालखीची माणसे पळता पळता बदलत होती. खालच्या चिखलातून पावलांचा अखंड नाद उमटत होता. आपल्यासाठी घेतले जाणारे कष्ट पाहून राजांचे डोळे बसल्याजागी भरून येत होते. विशाळगड अजून फार दूर होता.

दिवस दीड प्रहरावर आला आणि मागून येत असलेल्या मसूदची बातमी घेऊन हेर धावत आला. रात्रभर पळून थकलेल्या त्या जिवांचा थकवा ती

बातमी ऐकताच कुठच्या कुठे गेला. जीव पणाला लावून विशाळगडाचे अंतर कमी करण्यासाठी सारे धावू लागले. विशाळगड अजूनही फार लांब होता. सर्वस्व पणाला लावून पालखीने गजापूरची खिंड गाठली.

खिंडीपासून गडाचे अंतर अजून तीन कोसांचे होते. मागून येत असलेला शत्रू तर दृष्टिपथात आला होता. दीड हजारांचे दळ घेऊन मसूद त्वेषाने चालून येत होता. गजापूरच्या घोडखिंडीजवळ राजे आले आणि त्यांना बातमी लागली — विशाळगडाला सुर्वे आणि जसवंतसिंग वेढा देऊन बसले आहेत. गडावर पोहोचायचे झालेच, तर सुर्व्यांचा वेढा फोडूनच वर जायला हवे होते. मागून मसूद येत होता. वेढा फोडायचा कुणी?

राजांच्याबरोबर सहाशेच्या आसपास पायदळ. भोई वगैरेंची संख्या धरली, तरी आठशेच्या आतच माणूसबळ. रात्रभर चिखलराडीतून पंधरा कोस धावलेले, छाती फुटेपर्यंत पळालेले. ही माणसे आता ताज्या दमाच्या सुर्व्यांची फळी फोडणार होती. संतापाने बेभान झालेल्या मसूदला टक्कर देणार होती...

कधीही बधिर न होणारी राजांची विचारशक्ती सुन्न झाली. बाजीप्रभूंनी पालखी खाली ठेवण्याची आज्ञा केली. गजापूरच्या खिंडीत पालखी खाली ठेवली गेली. राजे बाहेर आले. बाजी म्हणाले,

''महाराज, आता वेळ करू नका. निम्मी शिबंदी घेऊन तुम्ही पुढं व्हा! सुर्व्यांची फळी फोडून तुम्ही गड गाठा.''

''आणि बाजी, तुम्ही?''

''मी येथे उभा राहतो! केवढाही वेळ लागो. शत्रूला खिंड ओलांडू देत नाही!''

''नाही, बाजी! जिवाची बाजी लावून आम्हांला इथवर आणलंत. आता जे होईल ते मिळून करू.''

''राजे!'' बाजी म्हणाले, ''प्रत्येक क्षण मोलाचा आहे. कृपा करून तुम्ही पुढे जा. जिवाची बाजी लावून तुम्हांला येथे आणलं, ते यासाठी नव्हे! या

कष्टांचं चीज करा. गनीम येतो आहे. दावा साधील. सारं क्षणात व्यर्थ होईल."

राजांनी बाजींना मिठी मारली. बाजी मुजरा करत म्हणाले,

"राजे, तुम्ही या. मुला-लेकरांना अन्न द्यायला तुम्ही समर्थ असता, मला काळजी कसली? पण राजे..."

"काय, बाजी?" राजे अश्रू आवरत विचारते झाले.

"राजे, गडावर जाताच इशारतीची तोफ द्या. बस्स! या, राजेऽऽ"

राजांनी बाजींना परत मिठी मारली. क्षणभर बाजीही त्या मिठीत विसावले. दुसऱ्याच क्षणी मिठी सोडवत बाजी बाजूला झाले. राजे आपल्या शिबंदीसह गडाकडे जाऊ लागले. राजे दिसेनासे होताच बाजी त्वेषाने मागे फिरले. सारे बांदल बाजींकडे पाहत होते.

"पाहता काय? राजे गडावर जाईपर्यंत एकही गनीम या खिंडीतून जाता कामा नये. राजांना गडावर पोहोचवायची जबाबदारी आपली आहे. बोला, हरऽऽहरऽऽ महाऽऽदेव!"

'हर हर महादेव'ची एकच गर्जना उसळली. पायांत त्राण आले. तलवारी उपसल्या गेल्या. बाजीप्रभू घोडखिंडीत उभे ठाकले. "दीन, दीन!" म्हणत मसूद चालून येत होता.

गजापूरच्या घाटीवर असलेली घोडखिंड आपले नाव सार्थ करणारी होती. दोन्ही बाजूंना उंच दरड होती. मध्ये अरुंद वाट होती. खिंड जवळजवळ दीडशे कदम लांब होती.

मसूदचे सैन्य खिंडीपाशी आले आणि बाजीप्रभूंचे बांदल मावळे त्वेषाने तुटून पडले. एकच कापाकापी सुरू झाली. मसूदचे सैन्य हटले. बाजीप्रभूंचे आघाडीचे मावळे मागे हटले. पाठीमागचे पुढे सरकले. थोड्या थोड्या अवधीने मसूदचे सैन्य हल्ला करत होते. बाजींचे सैन्य प्रतिकार करत होते. यात प्रहर उलटला.

राजे आपल्या तीनशे मावळ्यांसह गडाकडे धावत होते. गड नजरेत

आला होता. तोच सुर्व्यांच्या वेढ्याला खबर मिळाली—खुद्द शिवाजीराजे चालून येत आहेत.

सुर्वे राजांवर चाल करून आले. राजांच्या लोकांनी पराक्रमाची शर्थ केली. राजांसह सारे लढत होते. हळूहळू सुर्व्यांचा विरोध कमी होऊ लागला. त्यांचे सैन्य हटू लागले. हीच संधी घेऊन 'हरहर महादेव'ची गर्जना गडापर्यंत पोहोचली. सुर्व्यांचा वेढा कापून राजे आपल्या जखमी मावळ्यांसह विशाळगडाकडे धावू लागले.

गडावर भगवा झेंडा फडकत होता. क्षणाक्षणाला किल्ला जवळ येत होता. प्रत्येक मावळ्याला आयुष्याचे सार्थक झाल्यासारखे वाटत होते.

राजे सुटले होते. पण बाजी पुरे अडकले होते. बाजींची तीनशेंची फौज आता निम्मीही राहिली नव्हती. ज्याला जखम नाही, असा मावळा दिसत नव्हता.

बाजी रक्तबंबाळ झाले होते. पागोटे केव्हाच पडले होते. बलदंड शरीराचे बाजी शत्रूवर त्वेषाने फिरंग चालवत होते. डोईच्या संजाबातून मानेवर शेंडीचा झुबका रुळत होता. बाजींच्या अंगी वीरश्री संचारली होती. तीन प्रहर होत आले तरी खिंड काबीज होत नव्हती. दरड चढण्याचा प्रयत्न केला तरी त्यात यश येत नव्हते. मसूद संतापला होता, पण त्याचे काही चालत नव्हते. लढाईचे असे रूप त्याने आजवर पाहिले नव्हते. आतापर्यंत खिंडीवर तुटून पडणारे लोक खिंड जवळ येताच, बचावाचे धोरण धरत, दबकत पुढे सरकत होते. बाजींनी आता विटा हाती घेतला होता. खिंडीपासून काही अंतरावर विटा गनिमाचा वेध अचूक घेत होता. खिंडीच्या दारात अजिंक्य आत्म्यांचे कडे उभे ठाकल्याचा भास होत होता.

मसूदने बंदूक आणायला फर्मावले. बंदूक आणली गेली. नेमबाजाने नेम धरला आणि बार झाला. गोळी छाताडाला लागली. बाजी त्या धक्क्याने मागे कोसळले. बाजींना मागे आणले गेले. मावळे पुढे सरकले. खिंड परत अजिंक्यच राहिली.



बाजी शुद्धीवर आले. वर धुरकट आकाश दिसत होते. त्यांनी विचारले,

''तोफ झाली?''

नकारार्थी माना हालल्या. बाजी उठू लागले. जखमांनी माखलेल्या, वर्मी झालेल्या घावाने घायाळ बनलेल्या बाजींना कुणीतरी म्हणाले,

''बाजी! तुम्ही उठू नका. आम्ही खिंड राखतो.''

"तोफ झाली नाही?" म्हणत सारे बळ एकवटून बाजी उठले. त्यांनी माणसांना बाजूला सारले. धडपडत हातातल्या विट्यावर तोल सावरीत बाजी झोकांड्या देत गर्जले,

"गोळी लागली, म्हणून काय झाले? राजे गडावर पोहोचले नाहीत, आणि बाजी मरतो...?"

बाजी वाट काढीत खिंडीच्या प्रवेशद्वाराशी गेले. बाजींनी विटा हाती पेलला. रक्तबंबाळ बाजी समोर दिसताच पुढे येणारे गनीम मागे हटले. तोच गडावरून तोफेचा आवाज आसमंतात कडाडला.

बाजींच्या चेहऱ्यावर हसू उमटले. बाजी पुटपुटले,

"राजे गडावर पोहोचले. आपली फत्ते झाली!"

**प्रश्न :**

**अ.** १. शिवरायांची विचारशक्ती सुन्न का झाली?

२. प्रत्येक मावळ्याला आपल्या आयुष्याचे सार्थक झाले असे केव्हा वाटू लागले?

३. घोडखिंडीत मसूदला थोपवले नसते तर काय झाले असते?

**आ.** खालील वाक्प्रचारांचा वाक्यांत उपयोग करा.

वेढा आवळणे, वेढा फोडणे, जीव पणाला लावणे, जीव घेऊन पळणे.

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. 'बाजीप्रभूंनी अशी खिंड लढवली' या विषयावर दोन परिच्छेद लिहा.

२. 'बाजीप्रभू देशपांडे यांचे बलिदान' शिवाजीमहाराज जिजामातोश्रीस कळवत आहेत अशी कल्पना करून पत्र लिहा.

**व्याकरण :**

खालील वाक्यांतील सामान्यनामे, विशेषनामे आणि क्रियाविशेषणे शोधून लिहा.

१. दीड हजारांचे दळ घेऊन मसूद त्वेषाने चालून येत होता.

२. आतापर्यंत खिंडीवर तुटून पडणारे लोक खिंड जवळ येताच बचावाचे धोरण धरत दबकत पुढे सरकत होते.



# १६. अडाणी

**शंकरराव खरात (शंकरराव रामजी खरात)** — कथाकार व कादंबरीकार. 'बारा बलुतेदार', 'दौंडी', 'सांगावा', 'तडीपार' इत्यादी कथासंग्रह. 'झोपडपट्टी', मी मुक्त मी मुक्त' इत्यादी कादंबऱ्या तसेच सामाजिक विषयांवरची 'अस्पृश्यांचा मुक्तिसंग्राम' आणि 'डॉ. आंबेडकर यांचे धर्मांतर', 'तराळ-अंतराळ' इत्यादी यांची पुस्तके आहेत.

'तराळ-अंतराळ' या आत्मचरित्रातून हा उतारा घेतला आहे. निरक्षर माणसाला भोगावी लागणारी दुःखे यात आलेली आहेत, ती अंतःकरणाचा ठाव घेतात.

बाहेर अंधार पडत होता. माझ्या दारात दिवा लागला होता. दारात मला गेनूबुवा तराळ दिसताच मी आईला बोललो,

''आये! दारात तराळ आलाय!'' माझ्या आईनं तराळाला बघताच डोईचा पदर नीट केला. तोच माझ्या 'बा'नं त्यांना पुसलं,

''का वं! एकाएकी अंधार करून माज्या दारात?'' मग उभ्या उभ्याच गेनूबुवानं आपल्या दंडकीच्या खिशातून पत्र काढलं. ते माझ्या 'बा'च्या हातात देता देता म्हणाला, ''रामा! तुझ्या नावावर हे 'पतर' आलंय बघ.'' माझ्या बापानं तो कागद हातात घेऊन उलटा-पालटा करून दाराच्या उजेडात बघितलं. पुढं अंधारात नजर टाकली व आण्णा चितागती झाल्यागत गप्प झाला. माझ्या वडलांना मी 'आण्णा' म्हणत असे.

वास्तविक माझ्या बापाच्या एवढ्या हयातीत त्यांना कुणीच पत्र असं पाठवलं नसावं. त्यांना कोण कशाला पत्र पाठवणार? काय खबर आली, सांगावा आला, तर माणसाच्या तोंडीच येणार. तोंडातोंडीचा सांगावा हेच खरं पत्र-टपाल! पण पोष्टकार्डावर लिहिलेलं पत्र माझ्या 'बा'ला कधीच आलं नव्हतं. त्यात माझ्या बापानं सरकारी गावकीचं टपाल, कागदपत्राचा लखोटा

गावोगाव पाटील-तलाट्याला, महालकरी-मामलदाराला, हवालदार-फौजदाराला गावकीच्या कामात पोहोचता केलेला होता. त्यातच त्यांनी आपल्या आयुष्याचे दिवस खर्ची घातलेले होते. पण स्वतःला म्हणून कुणाचं पत्र आलेलं नव्हतं, हे मला घरात दिसत होतं. त्यांना तसं कुणी पत्र-टपाल धाडत नव्हतं, कुणी तसं धाडण्याचं कारणही नव्हतं. त्यात माझी थोरली बहीण पवित्रा नवऱ्याच्या गावी नांदायला होती. पण तिचं काय पत्र येण्याची आशाच नव्हती. आला तर सांगावा, निरोप येणार. त्यात माझ्या बापाची एक मावस बहीण मुंबईला होती. आता तेवढीच बया काय खबर कळवली तर पत्रानं कळवणार! पण तिनंही काय कवा मुंबईला असल्यापासून कागद-पत्र धाडला नव्हता. काय तसं कागद पाठवण्याचं कारणही कधी घडलं नसावं, पन काईतरी महत्त्वाचंच असावं अशी ही सगळी वस्तुस्थिती होती. मग गेनूबुवा तराळानं कुणाचा कागद द्यावा? या विचारात पडून माझ्या वडलानं-आण्णानं लागलीच तराळाला पुसलं,

"काय गा, ह्यो कागद मला आलाय म्हंतूच?"

"व्हय रं रामा, तुलाच आलाय!"

वडलानं हातातलं पत्र पुन्हा उलटं-पालटं बघितलं. त्याला विचारलं,

"यात माजं नाव, रामा तात्या असं लिव्हलंय?"

"तर काय? त्यात तुजा पत्त्यापण हाय!"

"हे पत्र माजंच हाय म्हण की!"

"तर दुसऱ्या कुणाचं न्हाय! तुजंच हाय बघ."

त्यात तराळ बोलता बोलता खाली बसला व वडलाला बोलला,

"रामा, जरा चिलीम तरी पेटव!"

मग माझा बाप तंबाकूनं चिलीम भरू लागला. तोवर मी त्याचं बोलणं ऐकून बाहेर आलो. कुणाचं पत्र आलं? म्हणून ते पत्र हातात घेऊन उलटं-पालटं करून पाहिलं. मी लहान होतो. अडाणीच. शाळेत जात नव्हतो. पत्र पाहून माझी वाचा बंदच. काय वाचणार? मला वाचताच येत नव्हतं.

बापानं—आण्णानं चिलीम पेटवली, एक झुरका मारून तराळाच्या हातात चिलीम देत सहज बोलला, ''व्हय गा! कुणाचा असावा हा कागद?''

''कुणाला ठावं! माझ्या हातात नायकानं दिलं. तेच्यापण हातात पोष्टमननं बाजारात दिलं.''

''पण त्या नायकाला पोष्टमन बाजारात काय बोलला असेल की!''

चिलमीचा झुरका मारून तराळ बोलला,

''आता मला का ते ठावं?''

''नव्हं! त्वा त्याला पुसायचं तरी पतरात काय मजकूर हाय तो?''

''व्हय गड्या! म्या तसं पुसायचं इसरलो,'' असं म्हणून तराळ पुढं बोलला,

''पण रामा, तो नायक काय लिवणार हाय व्हय!''

''तेबी खरंच हाय! पण त्यानं डाकवाल्याकडं कागद फोडून-बिडून घेतला तेवढंच इचारायचं!''

माझ्या वडलांच्या हातात चिलीम देत तराळ बोलला,

''व्हय! तेवढं मातर पुसायला पाइजे होतं खरं!''

आण्णानं माझ्या हातातून पत्र घेतलं. चौकटीत उजेडाच्या बाजूला धरलं. त्यावर नजर टाकली. ''या पत्रात काय जास्त लिवलबी न्हाय!''

''असं म्हंतूय?'' असं आश्चर्यानं बोलून तराळानं ते पत्र हातात घेतलं व चौकटीच्या आत उजेडात, त्यातल्या दोन ओळी बघून तोही चमत्कारिकपणे बोलला, ''रामा, तुला कवा नव्हं ते पतर आलं, पण तेबी आर्धच आलंय! काही महत्त्वाचा निरोप असंल. आता ते तलाट्याकडं नाय तर मास्तराकडं फोडून बघितल्याशिवाय कसं कळायचं?''

''तेबी खरंच! अत्ताच्या अत्ता तलाट्याकडं-कुलकर्ण्याकडं जातो!''

''अरं रामा! कुलकर्णी गावात न्हाय!''

''मग गावातल्या मास्तराकडं सकाळी जाऊन त्या मास्तराला गाटतो!''

सकाळी आण्णा हातात पत्र घेऊन निघाला. मीही त्याच्या पाठोपाठ निघालो. तोच आईनं आवाज केला, ''कुठं वं चाललाय?''

''अगं, आलेलं पत्तर तरी वाचून येतो गावात.'' मग आई गप्प झाली.

आम्ही मास्तरांच्या दारात गेलो. बाहेरच्या सोप्यात कुणीच दिसेना. म्हणून आण्णानं आत हाक दिली, ''मास्तर हायेत का घरात?'' त्याबरोबर आतून उलटा आवाज आला, ''कोण आहे रं बाहेर?''

''मी रामा हाय जी!''

असा आण्णाचा आवाज आत शिरल्या शिरल्या मास्तरीणबाई चटाचटा पाऊल टाकत बाहेर आली.

''आहो, आत काय करताय तुम्ही? दारात रामा ऐताच आलाय. पावसाचे दिवस... चार लाकडं तरी फोडून घ्या! आता स्वैपाकाला सरपण नाही!''

असं मास्तरीणबाई आत तोंड करून बोलली व पुन्हा आण्णाला म्हणाली,

''आरं! आमचं बघ सरपण संपलंय! लाकडाच्या चार ढलप्या तरी काढून दे! त्यात पावसाचं दिवस!''

आण्णा गप्प झाला... आता आण्णाच्यापुढं प्रश्न होता... मास्तरांच्याकडून पत्र वाचून घ्यायाचं होतं. त्यांच्याशिवाय खडाखडा पत्र फोडणार कोण? त्यांच्या दारात तर पत्र घेऊन आलो. पत्र तर वाचून घेणं भाग होतं.

''काय रामा! का सकाळीच दारात?'' मास्तरांनी बाहेर येऊन विचारलं.

''व्हय! तसं कामच पडलंय!''

''कसलं काम काढलंय रामा?''

''तसं काय भारी न्हाय!'' असं म्हणून दंडकीच्या खिशातलं पत्र काढून हातानं पुढं करून तो म्हणाला, ''हे पतर आलंय, तेवढं फोडून दावायचं हाय!''

ते पत्र मास्तरांच्या हातात टाकणार तो मास्तरांनी लागलीच आपलं काम सांगितलं,

''आरं रामा! स्वैपाकाचं घरात थटलंय! लाकडाच्या चार ढलप्या तरी

तेवढ्या काढून दे!''

"मी त्याला कुठं न्हाय म्हंतोय!'' असा आण्णाचा होकार आलाच. अन् तो सरळ पुढं बोलला, "द्या की कुऱ्हाड तेवढी. चार फाळ्या काढून देतु.'' आण्णाच्यापुढं दुसरा मार्गच नव्हता. त्याला पत्र वाचून घ्यायाचं होतं....

आण्णानं कुऱ्हाडीचं नाव काढताच मास्तर लागलीच सोप्यातूनच आत गेले. माळीच्या चौकटीतून आत बायकोला हाक मारली,

"आगं, ती आपली कुऱ्हाड कुठाय? रामाकडून आजच्यापुरत्या चार ढलप्या काढून घेतो!''त्याबरोबर आतून उलटा आवाज आला, "आहो! आजच्यापुरत्या काय बोलताय! चार-आठ दिवस पुरंल एवढं तरी त्याच्याकडून सरपण फोडून घ्या. तो ऐताच घावलाय! त्यात पावसाचं दिवस!''

आण्णाच्या कानांवर मास्तरीणबाईचं शब्द पडले. मग तो वैतागातच स्वतःला बडबडला —

'तुज्या घरचा नोकर नव्हं का! बरा घावलो तावडीत!'

आण्णाला वैताग येण्यासारखाच हा प्रसंग होता; पण त्याच्यापुढं आता काही इलाज नव्हता.

त्यात आम्हांला दोनच डोळं. पण मास्तर शिकल्यानं ते आता चार डोळ्यांचे झाले होते. कधीही नडी-आडीला असंच काय वाचून घ्यायला त्यांच्या दारापुढं जाण्याचा प्रसंग येणारच!

तेवढ्यात मास्तरांनी जडशीळ कुऱ्हाड आणून पुढं अंगणात धापकन टाकली व आण्णाला बोलले,

"रामा! भरा भरा चार दिवसांचं सरपण फोडून दे!'' तोच आण्णानं हातातलं पत्र मास्तरांच्या हातात वरून टाकलं. "मास्तर अगोदर तरी वाचून दावा मला!''

मास्तरांनी पत्र हातात धरून त्यावर नजर टाकली. तोच ते आण्णाला म्हणाले,

"रामा, मी अंघोळ करून आलोच. पाणी थंड होईल. मग तुझं पत्र वाचून दावतो, बरं का!"

पत्र वाचून घेण्यासाठी लाकडं फोडण्याची वेळ माझ्या 'बा'वर — आण्णावर आली होती.



आण्णा लाकडं फोडू लागला. पत्रात काय असेल याचे विचार मनात दाटत होतेच. लाकडं फोडून झाली, पण त्यात बराच वेळ गेला.

मग आण्णानं आत हाक दिली,

"मास्तर! आहो मास्तर!!" त्याबरोबर मास्तर आतून बाहेर आले. त्यांनी लागलीच विचारलं,

"काय रामा, झाली का लाकडं फोडून?"

"तो बघा की फोडलेल्या लाकडांचा ढीग!"

त्या ढिगाकडं पाहून मास्तरांनी आण्णाला शाबासकी दिली.

आण्णा लगेच म्हणाला, "आता तरी ते पत्र वाचून दावा!" मास्तरांनी त्यावर नजर फिरवली व विचारलं,

"अरं रामा, तुझी बहीण मुंबईला होती का?"

"व्हय होती! मावस भण धोंडाबाय! घरातल्यावानीच!"

"अरं तिला देवआज्ञा झाली. तुझी सारखी आठवण काढीत होती."

आण्णा कळवळला!

"आरं देवा! माझी धोंडाई गेली म्हंता...?"

आण्णा गप्प गप्प झाला, मोठ्या जुलमानं, खाली मुंडी घालून, मास्तरांच्या पायरीवरून उठला. खाली मान घालून वाड्याबाहेर पडला. वाटेला लागल्यावर त्यानं पाणावलेले डोळे पुसले.....

**प्रश्न :**

अ. १. रामाने पत्र घेताना गेनूबुवा तराळाला कोणकोणती विचारणा केली?

२. मास्तरांनी पत्र वाचून दाखवण्यात दिरंगाई का केली?

आ. प्रमाण भाषेत लिहा.

१. "काय गा, ह्यो कागद मला आलाय म्हंतूच?"

२. "व्हय रं रामा, तुलाच आलाय!"

३. "यात माजं नाव रामा तात्या असं लिव्हलंय?"

४. "तर काय? त्यात तुजा पत्त्यापण हाय!"

५. "हे पत्र माजंच हाय म्हण की!"

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. मास्तर व अडाणी अण्णा यांचे व्यक्तिचित्र रेखाटा.

२. 'दरवर्षी प्रत्येक विद्यार्थ्याने एका निरक्षराला साक्षर करावे' याबद्दलचे तुमचे विचार लिहा.

३. 'निरक्षरता हा समाजाला लागलेला कलंक आहे' या विचाराचा विस्तार करून एक परिच्छेद लिहा.

४. तुमच्या गावातील साक्षरता वर्गाचे उद्घाटन जिल्हाधिकाऱ्यांच्या हस्ते पार पडले आहे. या कार्यक्रमाचा वर्तमानपत्रात देण्यासाठी वृत्तान्त तयार करा.

५. साक्षरता-प्रसार गीतांचा संग्रह करून त्यातील गाणी पाठ करा.

**व्याकरण :**

१. सायंकाळी मुले घराकडे गेली.

२. मुले झाडाखाली खेळत आहेत.

३. शाळेसमोर एक फुलबाग आहे.

४. सूर्य डोंगरामागे गेला.

वरील वाक्यांतील कडे, खाली, समोर, मागे हे शब्द वाक्यात काही शब्दांना जोडून येतात व त्या शब्दांचा त्याच वाक्यातील दुसऱ्या खाद्या शब्दाशी असलेला संबंध दाखवतात. अशा शब्दांना **शब्दयोगी अव्यये** असे म्हणतात.





# १७. पत्र

**जोत्स्ना देवधर —** 'घरगंगेच्या काठी', 'कल्याणी', 'उत्तरयोगी', 'रमाबाई' या कादंबऱ्या आणि 'गाऱ्या गाऱ्या भिंगोऱ्या, 'सात घरांच्या सीमारेषा', 'मधली भिंत', 'उद्ध्वस्त', 'विंझणवारा', 'धुम्मस' हे यांचे कथासंग्रह प्रसिद्ध आहेत.

हे पत्र त्यांच्या 'हो-नाहीच्या उंबरठ्यावर' या पुस्तकातून घेतले आहे. आईपासून दूर राहणारी अनुराधा आपल्या मनातील खंत आईजवळ पत्रातून व्यक्त करते. त्यातून तिच्या मनाला आलेली मरगळ व ढळलेला आत्मविश्वास तिच्या आईला जाणवतो. मग तिची आई त्या पत्राला उत्तर पाठवते. त्यातून तिने धैर्य बाळगावे आणि जीवनातल्या लहानसहान अडीअडचणींना कसे सामोरे जावे याचे मार्गदर्शन करते.

---

'अहिल्यादेवी' मुलींचे वसतीगृह
पुणे ४११ ००४
दि. २३ नोव्हेंबर, १९९४

*ती. आईस शिरसाष्टांग नमस्कार.*

शाळा सुरू होऊन दोन दिवस झाले. आल्या आल्या तुला पत्र पाठवायला हवं होतं; पण शेवगाव सोडलं आणि मला भारी एकटं वाटलं. दहा-बारा दिवस तुझ्या कुशीत झोपायला मिळत होतं, तुझ्या हातचं छान छान गरम गरम जेवायला मिळत होतं. प्रभा-प्रकाश सारखे भोवती भोवती असायचे.

आई, आजसुद्धा पत्र लिहावं वाटत नाही. नाही लिहिलं तरी तू रागावशील, लिहिलं तरी रागावशील. परवा रिझल्ट लागला. मला अगदी म्हणजे अगदी बेताचे मार्क मिळाले आहेत. सांगायलासुद्धा लाज वाटते. कशात नापास झाले नाही, एवढंच त्यातल्या त्यात समाधान. मार्क कळले ना, त्या दिवशी सबंध दिवस रडत बसले. वाटलं, आपली आई किती काटकसरीनं राहते. आपण कष्ट करायला हवेत. खूप शिकून खूप मोठं व्हायला पाहिजे; पण हे असे मार्क पाहिले की वाटतं, द्यावं शिक्षण सोडून. काही जमत नाही आपल्याला. आई, माझं प्रगति-पुस्तक तुझ्याकडे सहीला

येईल तेव्हा तुझ्यासुद्धा डोळ्यांना पाणी येईल. तू रागावशील. आपली अनू शेवटी 'ढ'च निघाली,असं तुला वाटेल.

आई, चुकलंच माझं; न झेपणारी कामं अंगावर घेतली आणि अभ्यासाकडं दुर्लक्ष झालं.

आमच्या वर्गाची सहल बंगलोर-म्हैसूरला जाणार आहे. बाईंनी तुला विचारण्याकरता मला सांगितलं आहे. पण मी आधीच सांगून टाकलं, मी येणार नाही. कशाला ग सहलीला जायचं? उगाच पैशांचा खर्च आणि कमी मार्क मिळाले, म्हणून माझ्या मनात स्वतःविषयी राग आणि उणेपणाची भावना निर्माण झालीय. आत्मविश्वास तर उरलाच नाही, अभ्यासही होत नाही. खेळात, बोलण्यात — कशातच मन रमत नाही; एकटी एकटीच बसून असते.

तू मोठ्या हौसेनं करून दिलेला स्वेटर आल्याआल्याच शाळेत घालून गेले. तर आई, कौतुक करायचं सोडून मुली म्हणू लागल्या, 'अय्या, रंग तर अगदीच भडक आहे.' पण मी घालणार आहे तोच स्वेटर. त्यातली तुझ्या मायेची ऊब मलाच जाणवते. त्यांना ती कशी कळणार? ते जाऊ दे, पण अनेक कारणांनी मला फार उदास वाटतं आहे. जेवणाच्या ताटावर तर बसू नये असं वाटतं. सारखी तुझी आठवण येते.

आणि बरं का आई, आमच्या वर्गातल्या एका मुलीचं लग्न ठरलं आहे. फक्त पंधरा वर्षांची तर आहे. आईवडील खेड्यात असतात. इतक्या लवकर लग्न करायची तिची इच्छा नाही.अभ्यासात हुशार आहे; पण करणार काय बिचारी? एका श्रीमंत बिजवराशी लग्न होणार आहे तिचं. आई, तिचं रडणं बघून माझा जीव अगदी घाबरा होतो बघ.

बाकी सर्व ठीक. तुमची सर्वांची आठवण येते ग. वाटतंय, उगाच आले परत पुण्याला. तुझ्याचजवळ कायम राहता आलं तर....

चि. प्रभा-प्रकाशला आशीर्वाद. तू दिलेलं फराळाचं अजून पुरवून पुरवून खात आहे. आई, तू बरी आहेस ना? जप.

तुझीच

**अनुराधा**



।। श्री ।।

'मातृदा', म. गांधी मार्ग,
शेवगाव, जि. अहमदनगर
दि. २९ नोव्हेंबर, १९९४

*चिरंजीव अनुराधास अनेक आशीर्वाद.*

अनू, तुझं पत्र पोहोचलं. बरेच दिवस तुला एक गोष्ट सांगायची राहून गेलीय. ती म्हणजे तू पत्र लिहितेस ना, त्यावर 'श्री' नसतं. असं ओकं ओकं पत्र मला बरं वाटत नाही. आपल्या पद्धती, आपल्या चांगल्या सवयी,श्रद्धा आपण सोडू नयेत असं मला वाटतं. कोणत्याही शुभकार्याची सुरुवात आपण श्रीच्या स्थापनेनं करतो, हे आपल्याकडे होत असलेल्या कुळधर्माच्या वेळी तुझ्या लक्षात आलं असेलच. पत्राच्या सुरुवातीला वर माथ्यावर कागदाच्या मध्यभागी 'श्री' लिहीत जा नेहमी. पत्र उघडताच त्या एका अक्षरावरून तुझी खुशाली कळते, आणि मनाला कोण धीर मिळतो!

अनू, हे पत्र तर फारच निराश होऊन लिहिलंयस तू. स्वतःचे मार्क बघून निराश वाटणं साहजिक आहे, उदास होणं स्वाभाविक आहे; पण अनू, ही निराशासुद्धा प्रगतिकारक ठरली, तर वाईटातूनही चांगलंच बाहेर पडलं असं मी म्हणेन. अपयशानं निराश होणं, स्वतःला स्वतःचा राग येणं, कष्टी होणं अगदी स्वाभाविक आहे. पण तीच निराशा निश्चयानं बदलली तर, तो राग स्वाभिमानात बदलला तर, तीच चीड कष्टात बदलली तर.... अनू, याचा विचार कर, आणि हे बघ, आयुष्याची आता कुठे सुरुवात होत आहे. अपयशानं निष्क्रिय होणं केव्हाही अयोग्यच.

अनू, ज़ास्त निश्चयानं, कणखरपणानं, जिद्दीनं अभ्यासाला लाग. आता नऊमाही परीक्षेत चांगले मार्क मिळवलेस तर समजेन, की तू अपयशानं खचून गेली नाहीस; तर उलट त्यामुळे तुझ्या कर्तृत्वाला आवाहनच मिळालं.

आणि वेड्या, सहलीला जायचं नाही असं का म्हणतेस? प्रवासाची तर तुला खूप आवड. लहानपणी तुझे वडील बाहेरगावी जायला निघाले, की त्यांच्याबरोबर जायला निघायचीस. वडलांची फार लाडकी होतीस तू

तुझ्यामुळं त्यांना किती त्रास होई, पण तरीही ते तुला प्रत्येक वेळी बरोबर नेत असत. अनू, सहलीला जाच तू. तुझ्या मनाला आलेली मरगळ जाईल. बंगलोर–म्हैसूरला खूप पाहण्यासारखं आहे म्हणतात. सुंदर, भव्य, आगळं असं काही पाहिलं, की माणसाच्या मनात साहजिकच चांगले, उत्तम असे विचार येतात. चांगलं शिल्प, मनोवेधक निसर्ग पाहून काही तरी अपूर्व पाहिल्याचा आनंद मिळतो. सौंदर्याचा साक्षात्कार म्हणजे दैवी अंशाचा साक्षात्कारच वाटतो अनू. वृंदावन बाग तर थुई थुई नाचणाऱ्या कारंजांची मेजवानीच. अनू, सहलीला जाशील तर जाणत्या मनानं, उघड्या डोळ्यांनी जा. यात काय आहे, त्यात काय आहे ही प्रवृत्ती हल्ली तुम्हां मुलांमुलींमध्ये दिसते. ती शिष्टपणाची तर आहेच; पण लहान वयात असणाऱ्या सहजसुंदर अशा उत्सुकतेला मारक आहे. या वयात प्रत्येक गोष्टीत नावीन्य वाटणं हेच स्वभावधर्माला धरून आहे. सहलीला जाशील तर येताना बरोबर कितीतरी अनुभव घेऊन येता येईल. तिथली माणसं, त्यांची वागण्याची पद्धत, खाण्यापिण्याच्या त्यांच्या सवयी, तिथल्या चालीरीती..... मनात आणशील तर थोड्या वेळात खूप टिपता येईल. वर्गातल्या मुलींबरोबर काही दिवस सतत एकत्र घालवता येतील. एकमेकींचे स्वभाव कळतील. जरूर जा आणि आल्यावर मला लिही काय काय पाहिलंस ते. आणि हे बघ अनू, जाताना आपले कपडे, आपलं सामान याची यादी करून घे. काही विसरू, हरवू नकोस. बरोबर थोडीफार औषधे ठेव. मी तुला दिली आहेतच ती. बाईंच्या आज्ञेबाहेर जाऊन इकडे तिकडे जाण्याची टूम साहजिकच तुम्हां मुलींमध्ये निघेल; पण तसं करू नकोस. माणसानं शिस्त कधीच मोडू नये. येताना काहीबाही विकत आणू नकोस. हल्ली सगळ्याच गोष्टी महाग झाल्या आहेत. आणि मुख्य म्हणजे, आपली परिस्थिती चैनीच्या गोष्टी साठवण्याची नाही. तू आपल्या डोळ्यांनी सर्व पाहून ये. मी, तुझी भावंडं, तुझ्या डोळ्यांनी ते सर्व पाहू.

स्वेटर विणतानाच मला वाटलं होतं, की तुझ्या आवडीला उतरेल की

नाही. पण नवीन स्वेटर घेणं परवडणारं नव्हतं. तुला स्वेटर तर हवा होताच. मी विणला — मुली त्याबद्दलही तुझी चेष्टा करतात, हे वाचून हल्लीच्या मुलींची प्रवृत्ती दिसून आली. पण हे चांगलं नाही. तू त्यातून बाहेर पडलीस हे उत्तम. आईच्या मायेची लाज राखलीस. अनुबाळ, तुझ्यासारख्या शहाण्या मुलीचा कोणाही आईला अभिमानच वाटेल!

तुझ्या वर्गातल्या मुलीचं लग्न आहे म्हणतेस? तिच्याबद्दल अनुकंपा वाटणं अगदी साहजिकच आहे अनुराजा. कायद्यानं बालविवाहाला बंदी घातली तरी अशी लग्नं खेड्यापाड्यांतून सर्रास होत आहेत. त्यातच एका अजाण मुलीचा बळी पडणार आहे. माझ्या मनातसुद्धा गहिवर दाटून आला. पण सध्या तरी तू काय, मी काय — या बाबतीत काहीही करू शकत नाही. तरीही सामाजिक अन्यायाची चीड येणं, दुसऱ्या व्यक्तीच्या दुःखामुळं आपल्या डोळ्यांत अश्रू उभं राहणं, हे सुसंस्कृत मनाचं लक्षण आहे.

तू गेल्यापासून घर खायला उठलंय. दोन्ही मुलं कावरीबावरी झाली आहेत. तुम्हां बहीण-भावंडांचं प्रेम पाहून मला फार आधार मिळतो, दिलासा मिळतो. हल्ली हे प्रेमसुद्धा दुर्मिळ झालं आहे.

अनू, प्रकृतीला जप. निराशेतून वर ये. माझी काळजी करू नकोस. पत्र पुरे करते.

तुझी

**आई**

**प्रश्न :**

अ. १. परीक्षेत कमी गुण मिळाल्याने मनाला लागलेली खंत अनुराधा पत्रातून आईजवळ कशी व्यक्त करते?

२. स्वेटरमध्ये जाणवणाऱ्या मायेच्या उबेबद्दल अनुराधा काय लिहिते?

३. बालविवाहाबद्दल लेखिकेचा असंतोष दोन्ही पत्रांतून कसा व्यक्त झाला आहे?

४. पत्रातून आई, मुलीचा आत्मविश्वास कोणत्या प्रकारे वाढवते?

**आ.** विरुद्धार्थी शब्द लिहा आणि त्यांचा वाक्यांत उपयोग करा.
सुसंस्कृत, दुर्दैव, मारक, स्वाभाविक.

**इ.** 'ढ' निघणे, साक्षात्कार होणे, अनुकंपा वाटणे, बळी पडणे यांचा अर्थ सांगून वाक्यांत उपयोग करा.

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. राज्यपातळीवर तुम्ही क्रीडास्पर्धक म्हणून जाणार आहात, त्याबद्दल वडिलांना पत्र लिहा.
२. आईच्या पत्रातील मध्यवर्ती कल्पना लिहा.
३. आईच्या पत्रातील आशय लक्षात घेऊन त्याला शीर्षक सुचवा.
४. 'वर्गातील मुलांना जायकवाडी धरण पाहण्याची परवानगी मिळावी' यासाठी योग्य अधिकाऱ्याकडे पाठवायच्या अर्जाचा मजकूर तयार करा.

**व्याकरण :**

१. आमचे गुरुजी बुद्धिमान आणि मेहनती आहेत.
२. शालेय भांडारातून मी वह्या व पुस्तके विकत घेतली.
३. खेळायची खूप इच्छा होती; पण घंटा वाजली.
४. मी भरपूर अभ्यास केला; म्हणून प्रथम आलो.

वरील वाक्यांतील 'आणि', 'व', 'पण', 'म्हणून' हे शब्द, दोन शब्दांना किंवा वाक्यांना जोडतात. शब्द किंवा वाक्ये जोडणाऱ्या अव्ययांना **उभयान्वयी अव्यये** असे म्हणतात.

खालील वाक्यांतील उभयान्वयी अव्यये ओळखा.

१. राम आणि सीता वनात गेले.
२. रंग भडक आहे; पण मी तोच स्वेटर घालणार आहे.
३. पत्र लिहावेसे वाटत नाही; परंतु तू रागावशील म्हणून लिहीत आहे.





# १८. सुख पर्वताएवढे!

**म. ना. अदवंत** — लघुकथा व लघुनिबंध या क्षेत्रांत लेखन. 'मनाची मुशाफरी', 'मनाचे संकल्प', 'मनाली' हे यांच्या लघुनिबंधांचे संग्रह. 'संजीवनी', 'माणुसकीचा धर्म', 'नसते उपद्‌व्याप', 'काही गंभीर काही विनोदी' हे यांचे लघुकथासंग्रह होत.

सुखे मिळाली तरी समाधानी नसणे हा मानवी स्वभाव बरा नव्हे. समाधान हेच खरे सुख आहे, असा संदेश या निबंधात दिलेला आहे.

तुकाराम महाराजांचे अभंग मला फार आवडतात. कंटाळा आला, की मी त्यांची गाथा काढून माझ्या आवडीचे अभंग पुन्हा पुन्हा वाचत असतो. श्रेष्ठ संत म्हणून तुकाराम महाराजांविषयी माझ्या मनात फार मोठा आदर आहे. असे असूनही त्यांच्या एका अभंगातील एक ठरावीक ओळ आली, की माझ्या मनाला एकदम काही तरी खटकते. त्यातील सत्य मनाला पटत नाही. नित्याच्या अनुभवाला येणारी ही गोष्ट नाही, असे वाटू लागते.

'सुख पाहता जवापाडे, दुःख पर्वताएवढे!' ही ती ओळ.

इतरांना काय अनुभव असेल तो असो, मला मात्र तसे वाटत नाही. याचा अर्थ मी सुखामध्ये लोळतो आहे, असा मात्र नाही. अनेक दुःखद प्रसंगांना आजवर मला तोंड द्यावे लागले आहे; पण ते दुःख संपले आणि पुढील क्षणाचा व सुखाचा आस्वाद घेण्यास मी सिद्‌ध झालो. एरवी येणाऱ्या सुखापेक्षा दुःखानंतर आलेले सुख नक्कीच विशेष असते. तहानेच्या वेदना अनुभवल्या म्हणजे पाण्याची खरी गोडी कळते. सुखाचेही तसेच नाही काय? दुःखातून मिळालेले हे सुख नंतर 'जवापाडे' कसे म्हणायचे?

शिवाय मुळातच 'दुःख पर्वताएवढे' असे समजण्याची माझी तयारी नाही. 'दुःख हे जवाप्रमाणे आहे आणि सुख पर्वताएवढे आहे' असे मला आग्रहाने

सांगायचे आहे. ते पटवून देण्यासाठी फार दूरवर जावयास नको. तुमच्या आतापर्यंतच्या जीवनाचा चित्रपट तुम्ही नजरेसमोर आणा. तुम्हांला त्यात कोणकोणत्या गोष्टी प्रामुख्याने आठवतात? बाल्यातील अतिशय सुखाचा काळ तुम्हांस आठवेल. आपणावरील आईच्या प्रेमाचे तुम्हांस स्मरण होईल. परीक्षेत उत्तम यश मिळवल्याबद्दल गुरुजींनी व वडिलांनी केलेल्या कौतुकाची तुम्हांला आठवण होईल. या गोष्टी दुःखाच्या का आहेत?

आपण भावी जीवनाची चित्रे ज्या वेळी रंगवू लागतो, त्या वेळी आपण कधी दुःखाची चित्रे रंगवतो का? परिस्थिती कितीही बिकट असली, वर्तमानकाळात कितीही दुःखे आपणाला भोगावी लागत असली, तरी भावी काळाची आपण रंगवत असलेली चित्रे अत्यंत सुखदायक असतात. त्या कल्पनाचित्रांत आपण रमतो आणि वर्तमानकाळचे दुःख विसरतो. हे जर खरे आहे, तर 'सुख जवापाडे' असे का मानायचे?

वर्तमानकाळातील दुःख अनेकदा आपणाला त्रासदायक होते, हे खरे आहे. पुष्कळदा ते 'असह्य, वाटू लागते व अशा वेळी 'दुःख पर्वताएवढे' ही तुकारामांची उक्ती आपणाला पटू लागते. पण तीच तर आपली खरी परीक्षा आहे. दुःखे येतात, ती आपली कसोटी पाहण्यासाठीच. त्या वेळी न डगमगणे हा तर खरा पुरुषार्थ. भट्टीतून तावून सुलाखून निघाल्याखेरीज सोन्याला तेज चढत नाही. टाकीचे घाव सोसल्याशिवाय दगडाला देवपण येत नाही, हे आपणाला माहीत नाही काय? पैलू पाडल्याखेरीज हिऱ्यालासुद्धा किंमत येत नाही.

महात्मा गांधी, पंडित जवाहरलाल नेहरू अशांसारखी मोठमोठी नावे आपण ऐकतो व आपले मस्तक आदराने नम्र होते. पण त्यासाठी त्यांना दुःखांचे आणि संकटांचे किती घाव सहन करावे लागले, याची आपणाला कल्पना असतेच. तुमचेच उदाहरण घ्या ना. परीक्षा जवळ आली, की आपण रात्रभर जागून अभ्यास करीत असतो. 'नको हा अभ्यास' असे कितीदा तरी आपणाला वाटते, तरी साऱ्या वेदना परीक्षेच्या पुढील निकालावर लक्ष ठेवून

आपण सहन करतोच ना? 'अभ्यास पर्वताएवढा' असे त्या वेळी आपणाला कदाचित वाटले असेल, पण परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर आपणाला तसे वाटते काय? आणि वाटलेच तर पर्वत जिंकल्याचा आपणाला वाटणारा अभिमान कमी असतो का? दुःखाचे तसेच असते. आपल्या जीवनातील या कसोट्या आहेत. त्या देत असताना 'दुःख पर्वताएवढे' अशी कुरकूर आपण का करावी?

त्याचे खरे असे आहे, दुःख किंवा सुख मिळवणे हे बहुतांशी आपल्या वृत्तीवर अवलंबून आहे. दुःखाच्या ओझ्याखाली दडपून गेलेली माणसेसुद्धा अनेक वेळा अतिशय प्रसन्न मनोवृत्तीची असतात, तर सुखात लोळणारी माणसे पुष्कळदा दुःखी, किरकिरी असतात. मला माझ्या एका मित्राचे उदाहरण आठवते. सतत त्याचा चेहरा रडवा. कितीही आनंदाची गोष्ट घडली असली, तरी त्याच्या चेहऱ्यावर हास्य उमटायचे नाही.

पण अशी माणसे स्वतःही दुःखी राहतात आणि दुसऱ्यालाही दुःखी करतात. एका मासिकात मागे एक व्यंग्यचित्र आले होते. दोन माणसे टेबलाशी बसलेली त्यात काढली होती. प्रत्येकासमोर अर्धा भरलेला एकेक पेला ठेवलेला होता. त्यापैकी एकजण 'माझा अर्धा पेला रिकामा' म्हणून शोक करत होता, तर दुसरा 'माझा अर्धा पेला भरलेला' म्हणून आनंद मानत होता. दुःखाचे डोंगर कोसळले, तरी या दुसऱ्याची प्रसन्न वृत्ती डगमगत नाही. आपल्या जीवनात तर तो आनंद निर्माण करतोच, पण भोवतालच्या जगातही तो आनंद पसरवतो. 'पर्वताएवढे दुःख आले, तरी मी ते जवाप्रमाणे मानीन' ही त्याची धमक असते. 'आनंदी आनंद गडे। जिकडे तिकडे चोहिकडे' असे वातावरण चोहीकडे भरले असताना विनाकारण सुतकी चेहरा करून बसण्याची त्याची तयारी नसते.

जीवनात विलक्षण आनंद आहे व तो आनंद याच वृत्तीमुळे अनुभवता येतो. निदान मला तरी तसे वाटते, आणि म्हणूनच संदेश देण्याइतका कधी

काळी मी मोठा झालोच, तर मी लोकांना संदेश देईन — 'दुःख पाहता जवापाडे, सुख पर्वताएवढे — या वृत्तीने जगात जगा.'

**प्रश्न :**

१. दुःखातून मिळालेले सुख विशेष असते हे लेखकाने कसे स्पष्ट केले आहे?
२. 'दुःख पर्वताएवढे' अशी कुरकुर आपण करू नये हे पटवण्यासाठी लेखकाने कोणकोणती उदाहरणे दिली आहेत?
३. सुख आणि दुःखाबाबत संदेश देताना व्यंग्यचित्राचा उपयोग कसा करून घेतला आहे?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. लेखकाने वर्णिलेली जीवन जगण्याची शैली थोडक्यात लिहा.
२. 'टाकीचे घाव सोसल्याशिवाय दगडाला देवपण येत नाही' या कल्पनेवर आधारलेली एखादी गोष्ट किंवा प्रसंग थोडक्यात लिहा.

**व्याकरण :**

१. शाबास! असेच यश तुला सतत मिळत राहो.
२. अहाहा! किती सुरेख चांदणे पडले आहे आज!
३. बापरे! केवढा साप होता तेथे!
४. छे! त्याने मुळीच अभ्यास केला नाही.

शाबास, अहाहा, बापरे, छे यांसारख्या शब्दांतून आनंद, दुःख, आश्चर्य, तिरस्कार इत्यादी भावनांचे आवेग दर्शवणाऱ्या अव्ययांना **उद्गारवाचक** किंवा **केवलप्रयोगी अव्यये** असे म्हणतात.

खालील वाक्यारंभी योग्य ती केवलप्रयोगी अव्यये वापरा.

१ .....! काय सुंदर देखावा आहे हा!
२ .....! तूच का म्हणतोस हे!
३ .....! केवढी ही भीमाशंकराची भव्य यात्रा!





# १९. भूकंप

**प्रभाकर विष्णु सोवनी** — पुणे येथील फर्ग्युसन महाविद्यालयातील भूशास्त्र विषयाचे निवृत्त प्राध्यापक. अमेरिकेत प्रगत शिलाशास्त्राचा अभ्यास. अनेक नियतकालिकांतून विज्ञानविषयक लेखन प्रसिद्ध. 'पाषाणशास्त्र', 'रंजनातून बुद्धिविकास', 'टपाल तिकिटातून विज्ञान', 'ज्ञान-विज्ञान आणि मनोरंजन' इत्यादी यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत.

भूकंपाचे धक्के बसण्याची कारणे कोणती? भूकंप म्हणजे नेमके काय? त्यामुळे प्राणहानी कशी होते? ती टाळण्यासाठी कोणती खबरदारी घ्यावी? इत्यादी माहिती या पाठात दिली आहे.

महाराष्ट्रात दोनदा भूकंपाचे धक्के बसले. पहिला धक्का ११ डिसेंबर, १९६७ रोजी कोयनानगर येथे, तर दुसरा ३० सप्टेंबर, १९९३ रोजी मराठवाड्यातील किल्लारी वगैरे गावी बसला. दुसऱ्या धक्क्याच्या मानाने पहिला धक्का जवळजवळ तीस पटीने अधिक शक्तीचा होता. असे असूनही कोयनानगर येथील भूकंपाच्या मानाने मराठवाड्यात झालेल्या भूकंपात अधिक प्राणहानी व वित्तहानी झाली. असे का झाले? हे समजून घेण्यासाठी आपणांस भूकंपाविषयीची शास्त्रीय माहिती असणे आवश्यक आहे.

भूकंप किंवा धरणीकंप म्हणजे जमिनीत होणारी कंपने किंवा जमिनीचा थरकाप. पृथ्वीच्या कवचातल्या खडकांना काही कारणाने एकदम धक्का बसला म्हणजे धक्का बसलेल्या ठिकाणापासून कंपने निर्माण होतात. ही कंपने पृथ्वीच्या पृष्ठावरून पुढे सरकताना जमीन हादरते. यालाच आपण भूकंप झाला असे म्हणतो. भूकंपाचे धक्के बसण्याची दोन प्रमुख नैसर्गिक कारणे आहेत. एक म्हणजे ज्वालामुखीचा उद्रेक. ज्वालामुखीच्या उद्रेकातून पाण्याची वाफ, इतर वायू, शिलारस आणि इतर तप्त पदार्थ उफाळून वर येतात. त्या वेळी स्फोट होऊन भोवतालचा भूप्रदेश हादरतो; पण अशा



भूकंपाची तीव्रता खूपच कमी असते. दुसरे म्हणजे भूकवचाची सतत संथपणे होत असलेली हालचाल आणि त्यातून निर्माण होणाऱ्या ताणांमुळे खडक मागेपुढे सरकून भंगणे. मोठ्या शक्तीच्या भूकंपाचा धक्का या दुसऱ्या कारणामुळे बसतो. भूकवचाची सतत संथपणे हालचाल होत असते. दीर्घकाळ चालू असणाऱ्या हालचालींमुळे खडकांच्या थरांत ताण निर्माण होतो. तो हळूहळू वाढतो. अखेर खडकांना तो पेलवणार नाही इतका झाला, की खडकांचे थर फुटतात आणि खाली, वर किंवा मागे-पुढे सरकतात. या प्रकाराला विभंग किंवा स्तरभ्रंश म्हणतात.

पृथ्वीच्या कवचातल्या खडकांची अशी सतत सावकाशपणे हालचाल का चालू असते, याचे बरीच वर्षे कोडे पडले होते. पण गेल्या तीस-चाळीस वर्षांत त्यावर संशोधन होऊन हे कोडे बरेचसे उलगडले आहे. या संशोधनात असे आढळले, की पृथ्वीचे कवच हे सफरचंदाच्या सालीसारखे सलग, एकसंघ नसते; ते सीताफळावरची साल असते तसे लहान-मोठ्या आकाराच्या तुकड्यांचे मिळून बनलेले आहे. या तुकड्यांनाच 'भूपट्ट' असे नाव आहे. पृथ्वीच्या भूकवचात असे सहा मोठे आणि बारा-तेरा लहान

भूपट्ट आहेत. पृथ्वीच्या कवचाखाली अत्यंत दाट, अर्धवट घट्ट असे प्रावरण असते. पाण्यावर जाड फळ्या तरंगतात, तसे हे सर्व भूपट्ट या प्रावरणावर तरंगत असतात. ही हालचाल अत्यंत संथ असते.

भूकंपाच्या धक्क्यांचे मापन करून त्याचे शास्त्रशुद्ध वर्गीकरण करणारी अमेरिकेत एक संस्था आहे. तिचे नाव आहे कॅलिफोर्निया इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी. या संस्थेतील भूकंपतज्ज्ञ डॉ. चार्लस् एफ. रिश्टर यांनी भूकंप-मापन श्रेणी तयार केली. म्हणून या भूकंपमापन श्रेणीला रिश्टर भूकंप महत्ताश्रेणी असे नाव आहे. आता जगभर याच मापन श्रेणीचा वापर केला जातो.

भूकंप तरंगांमुळे प्रामुख्याने बांधकामाचा पाया प्रथम कंपायमान होतो. पायावरचे बांधकाम मजबूत नसल्यास ते लगेच भंग पावून खाली कोसळते. भुसभुशीत पायावर बांधलेल्या इमारतींना भक्कम दगडाच्या कठीण पायावर उभारलेल्या इमारतींपेक्षा अधिक धोका असतो. अशा वेळी बांधकामाच्या पायात स्तंभिका (पाईल्स) वापरतात. या स्तंभिका सुट्या नसतात. त्या भक्कम आधारांनी एकमेकींना जखडून ठेवलेल्या असतात. भूकंपप्रवण भागातील इमारती लांबच लांब असू नयेत. गॅलरी, कॅनॉपी यांसारखे पुढे झुकलेले, लोंबते भाग असल्यास भूकंपात हे सुटे भाग वेगळे कंप पावून पडतात. म्हणून असे भाग मजबूत पोलादी सळ्यांनी मुख्य इमारतीला जखडून घ्यावेत. लांबच लांब इमारती बांधताना पुढील काळजी घ्यावी. लांब इमारत सुट्या अनेक एककांच्या स्वरूपात बांधावी. प्रत्येक एककाच्या मध्ये किमान १० ते १५ सें.मी. चे अंतर ठेवलेले असावे. एल. (L), टी. (T) अथवा यू. (U) च्या आकारातील इमारती दोन किंवा तीन सुट्या एककांच्या बांधाव्यात. मधला मोकळा भाग साध्या माती-चुन्याच्या गिलाव्याने भरावा. भूकंपात अशा इमारतींचे वेगवेगळे भाग वेगवेगळ्या दिशेत हलतात. वरीलप्रमाणे सुट्या एककांच्या स्वरूपात इमारती बांधल्यास मधला गिलावा फक्त पडून जातो, पण इमारतींना धक्का पोचत नाही.

मराठवाड्यातल्या बहुतेक इमारती केवळ दगड-मातीच्या होत्या; म्हणून भूकंपात त्या कोसळून प्रचंड प्राणहानी झाली. काश्मीरात लाकडी पट्ट्यांची चौकट करून ती मातीने लिंपतात. तसेच आसामात कुडाच्या भिंती करून त्या शेण-मातीने लिंपतात, अशा प्रकारच्या भिंती मोठ्या भूकंपातही कोसळत नाहीत. फार तर फक्त भिंतींचे पोपडे पडतात. या भिंतींमुळे थंडी तसेच उष्णता यांपासूनही संरक्षण मिळते आणि त्या कमखर्ची असून सहजपणे स्थानिक मालातून बांधता येण्याजोग्या आहेत. रुडकी येथील विद्यापीठात भूकंप प्रतिरोधक बांधकामासंबंधी संशोधनकार्य चालू आहे.

भूकंपप्रवण भागात भूकंप प्रतिरोधक अशा इमारती बांधाव्यात, तसेच अशा भागात राहणाऱ्या नागरिकांना भूकंपाचा धोका टाळण्यासाठी कसे वागावे याचे प्रशिक्षण द्यावे. भूकंपप्रवण भागातील नागरिकांसाठी काही महत्त्वाच्या उपयुक्त सूचना पुढे दिल्या आहेत.

१. घरातील सर्वांनी स्वयंपाकाच्या गॅसचा सिलिंडर-व्हॉल्व्ह बंद करण्याचे, तसेच विजेचा मेन स्विच बंद करण्याचे शिक्षण घ्यावे.
२. माणशी ४ ली. प्रमाणे घरातील सर्वांना किमान ३ दिवस पुरेल एवढ्या पिण्याच्या पाण्याचा साठा तयार ठेवावा. तीन-चार दिवस टिकणारे कोरडे खाद्यपदार्थ नेहमी राखून वेगळे ठेवावेत.
३. बॅटरीवर चालणारा ट्रान्झिस्टर, रेडिओ घरी चालू स्थितीत ठेवावा.
४. घरातील उंच कपाटे, घडवंच्या भिंतीशी लोखंडी पट्ट्या व बोल्टनी पक्क्या जखडून ठेवाव्यात. काचेच्या खिडक्यांपासून पलंग दूर ठेवावा.
५. भूकंपाच्या प्रसंगी शक्यतो घरातून मोकळ्या जागेत जावे.
६. घरात लागलेली छोटी आग विझवू शकेल अशा प्रकारची अग्निशामक साधने तसेच प्रथमोपचार पेटी तयार ठेवावी.
७. भूकंपाच्या वेळी रस्त्यावर असल्यास उंच इमारतीपासून दूर राहावे. जवळपास मोकळी जागा नसल्यास इमारतीच्या दरवाज्यात, चौकटीत उभे राहावे. घरात असल्यास आणि तातडीने घराबाहेर पडणे शक्य

नसल्यास टेबलाखाली अथवा पलंगाखाली जावे.

८. भूकंपप्रवण भागातील शाळांमध्ये विद्यार्थ्यांना अशी शिकवण देऊन त्यांच्याकडून प्रात्यक्षिकेही करून घ्यावीत.

भूकंपाच्या भाकिताचे तंत्र केव्हा परिपूर्ण होईल ते होवो; पण आपला प्राण वाचवण्याचे तंत्र प्रत्येकाने अवलंबल्यास कितीतरी प्राणहानी निश्चितपणे टळू शकेल.

**प्रश्न :**

१. भूकंप कोणत्या कारणांनी होतो?

२. ज्वालामुखीच्या स्फोटक उद्रेकाचा काय परिणाम होतो?

३. भूकंपाच्या धक्क्याचे मापन करण्यासाठी कोणती मापनश्रेणी वापरली जाते?

४. भूकंपग्रस्त भागात कोणत्या प्रकारची घरे बांधणे आवश्यक आहे?

५. भूकंपग्रस्त भागातील नागरिकांनी कोणकोणत्या गोष्टी लक्षात घ्याव्यात?

**स्वाध्याय व उपक्रम**

१. एक भूकंपग्रस्त व्यक्ती आपणांस भेटली अशी कल्पना करून ती तुम्हांला काय सांगेल ते सात-आठ वाक्यांत लिहा.

२. भूकंप झालेल्या भागात आपला नातलग अथवा मित्र आहे असे समजून त्याचे मनोधैर्य वाढवणारे पत्र लिहा.

**व्याकरण :**

१. 'सोनी घरी आली' या तिन्ही शब्दांतील 'इकार' दीर्घ आहेत. मराठी भाषेत शब्दाच्या शेवटी येणारे 'इकार' व 'उकार' दीर्घ असतात. उदा. पाटी, वाटी, पेरू इत्यादी.

२. 'दिवा, सुरी, पाहिजे' या शब्दांतील अन्त्य अक्षर दीर्घ असल्यामुळे उपान्त्य अक्षरातील 'इ' व 'उ' दीर्घ केले नाहीत. मराठी शब्दाचे अन्त्य अक्षर दीर्घ स्वरान्त असेल तर त्यातील उपान्त्य इकार व उकार ऱ्हस्व असतो.





# २०. मनातले चांदणे

**मधु मंगेश कर्णिक** — कथाकार व कादंबरीकार. गाव आणि शहर यांतील जीवनानुभव ते आपल्या कथा-कादंबऱ्यांतून उत्कटतेने मांडतात. 'भाकरी आणि फूल', 'तोरण', 'तहान', 'माहीमची खाडी', 'अबीर गुलाल', 'माझा गाव', 'माझा मुलूख' इत्यादी यांची पुस्तके.

गरीब व्यक्तींना जीवनाला सामोरे जाताना बऱ्याच अडचणींना तोंड द्यावे लागते. जिद्द राखून स्वावलंबनाने शिक्षण घ्यावे लागते; परंतु त्यातही एक आगळा आनंद असतो. अशा व्यक्ती ज्यांच्याकडून आपणास प्रेरणा मिळाली त्यांच्याबद्दल मात्र आदर कायम ठेवतात, हे बल्लूच्या गोष्टीवरून पाठात दाखवण्याचा प्रयत्न केलेला आहे.

---

त्या दिवसापर्यंत बल्लूला आम्ही कोणीच पाहिले नव्हते. रोज भल्या पहाटे आपल्या दाराच्या फटीतून वृत्तपत्राची घडी सरकवणारा कोण असतो, हे आपल्याला कुठे माहीत असते? आपण जेव्हा गाढ झोपेमध्ये असतो, तेव्हा कोणीतरी हळूच ते वृत्तपत्र आणून टाकते, एवढेच आपल्याला ठाऊक असते. पण अगदी योगायोगाने त्या दिवशी वृत्तपत्रांची गाडी उशिरा आल्यामुळे, रोज आमच्या दाराखालून पेपर सरकवणारा बल्लू आम्हांला भेटला. आम्ही सारे त्याची जशी काही वाटच पाहत होतो. ताजी बातमी वाचण्यासाठी प्रत्येकजण उत्सुक असतो. त्या दिवशी आम्हीही पेपरची वाट पाहत होतो, तेवढ्यात बल्लू दारात डोकावला.

दहा-अकरा वर्षांचे वय, सावळा तजेलदार वर्ण, तरतरीत चेहरा आणि पाणीदार डोळे, चपळ हालचाली! पेपरची घडी त्याने दारातून आत टाकली, किंचित घुटमळला आणि म्हणाला, "थोडं पाणी मिळेल प्यायला?"

आम्ही चहा पीत होतो. मी विचारले, "चहा पितोस?"

"नको, पाणी द्या."

का कुणास ठाऊक, पण मला त्या मुलामध्ये काही वेगळेपणा दिसला. त्याने आत यावे, पाणी प्यावेच — पण आमच्याबरोबर थोडा चहाही घ्यावा, असे मला वाटले. मी त्याला पाणी दिले, ते तो घटाघट प्याला. मग त्याने कपाळावरचा, मानेवरचा घाम खिशातल्या रुमालाने टिपला नि म्हणाला,

''सकाळीच तहान लागली, कारण पेपर टाकण्यासाठी धावत गेलो ना घरोघरी.''

''धावत का जावं? सावकाश जावं.''

''पेपर उशिरा आले. तुमच्यासारख्या साहेबलोकांना ऑफिसात जाण्यापूर्वी पेपर मिळायला हवा, म्हणून धावत आलो. झालंच तर मलाही शाळेत जायला उशीर झाला असता....''

''तू शाळेत जातोस?''

''हो, सहावीत आहे.''

''कुठल्या शाळेत जातोस?''

''म्युनिसिपालिटीच्या.....''

''तुझं नाव काय?''

''बल्लू.''

''छान आहे तुझं नाव, बल्लू....'' मी त्याचे नाव दोन-तीन वेळा तोंडात घोळवले.

''शाळेतलं नाव बल्लव.''

''पण बल्लूच छान वाटतं.''

बल्लू गमतीदार हसला, तेव्हा त्याचे मोत्यासारखे चमकदार स्वच्छ दात दिसले.

मग बल्लू काखेत पेपरांची चळत घेऊन लगबगीने, जवळजवळ पळतच निघून गेला. जाताना हसत म्हणाला, ''जातो, उशीर होईल.''

नंतर बल्लू सकाळचा दिसला नाही. आम्ही सकाळी उठण्यापूर्वी तो पेपर टाकून निघून जायचा. पण एके दिवशी रविवारी तो अवचित उगवला. दुपारी

बाराचा सुमार होता. दूरदर्शनवर पशुपक्ष्यांवर आधारित चित्रमालिका लागलेली होती व घरातील लहानमोठे सर्वजण ती पाहण्यात रंगून गेले होते. तोच बल्लू येऊन तेथे हजर झाला. सगळ्यांबरोबर तोही ती मनोवेधक चित्रमालिका पाहू लागला. चित्रमालिका संपल्यावर मी बल्लूला विचारले, ''बल्लू, तू केव्हा आलास?''

''आताच! सगळे प्राणी पाहायला मिळाले. त्यासाठीच मुद्दाम इथं आलो. झालंच तर बिल....'' हातातल्या फायलीतून आमचे पेपरचे बिल काढून माझ्या हाती देत तो म्हणाला.

''तुला आता बिल गोळा करायचं काम मिळालं वाटतं?'' मी त्याच्या हाती पैसे देत म्हणालो. ''म्हणजे शेटजींनी तुला बढती दिली.''

बल्लू पूर्वीसारखा प्रसन्न हसला. त्याचे हास्य खरोखरच फार सुंदर होते.

''माझं गणित चांगलं आहे. मी हिशेब बिनचूक करतो, म्हणून शेटजींनी हे बिलांचं काम मला दिलं.''

''किती बिलं बनवतोस?''

''मी पन्नास बनवतो. त्याशिवाय कॉलेजमध्ये शिकणारे आणखी विद्यार्थीही बिलं बनवत असतात.''

''तुला पगार किती मिळतो बल्लू?''

''शंभर रुपये.....'' तो ऐटीने म्हणाला.

''घरी कोणकोण आहेत तुझ्या?''

''आई, वडील आणि दोन लहान भावंडं. वडील गिरणीत होते, संपात त्यांची नोकरी सुटली.''

जणू काही मी पुढचे प्रश्न विचारीन हे ओळखून बल्लूने सविस्तर माहिती दिली. आमच्या घरापलीकडे असलेल्या झोपडपट्टीतल्या अनेक गरीब कुटुंबांतील एका कुटुंबातला बल्लू होता. शाळेत जाऊन अभ्यास करत होता. शिकता शिकता मेहनत करून दरमहा शंभर रुपयांचा हातभार घरच्या संसाराला लावत होता. बल्लूने विचारले, ''दर रविवारी मी या वेळेला

तुमच्या घरी आलो तर चालेल?''

''का रे?''

''ही प्राण्यांची मालिका आहे ना, ती मला खूप आवडते. ती पाहण्यासाठी मी येईन. संपली की निघून जाईन.''

''तुझ्या घराशेजारी कोणाचा टी.व्ही. नाही?''

''आमच्या वस्तीत एकदोघांकडे आहेत,पण ते दारं लावून घेतात. माझी आई कामाला जाते त्या शेटजींकडे तुमच्या टी.व्ही.सारखाच मोठा रंगीत टी.व्ही. आहे. तिथं एकदा मी आईबरोबर गेलो, तर ते आईला रागे भरले. म्हणाले, 'मोलकरणीच्या मुलासाठी आम्ही टी.व्ही. लावत नाही! '' बोलता बोलता त्याला गहिवरून आले. तो गप्प राहिला.

''ठीक आहे.... तू दर रविवारी येत जा इथं टी.व्ही. पाहायला बल्लू....''

बल्लूचा चेहरा खुलला. तो आनंदाने उड्या मारतच निघून गेला आणि पुढल्या रविवारी पशुपक्ष्यांवरील चित्रमालिका सुरू होण्यापूर्वी मिनिटभर आधी येऊन हजर झाला. त्या दिवशी कुत्र्यांविषयी माहितीपूर्ण घटनांच्या आधारे एक मनोरंजक कार्यक्रम दाखवला जाणार होता.

टी.व्ही. बंद केल्यावर बल्लू जायला निघाला. जाण्यापूर्वी तो किंचित घुटमळला आणि त्याने हळूच मला विचारले, ''तुम्ही लेखक आहात ना?''

बल्लूचा हा प्रश्न मला अनपेक्षित होता. मी त्याला उलट विचारले, ''तुला कोणी सांगितलं?''

''तुमच्या नावाची पाटी आहे ना दारावर. मी पेपर टाकायला पहिल्यांदा इथं आलो, तेव्हाच ओळखलं होतं. आम्हाला पाचवीला धडा होता तुमच्या 'मोतीचा'....''

मला बल्लूचे अधिकच कौतुक वाटू लागले. मी त्याला माझ्याजवळची गोष्टींची, चित्रांची काही पुस्तके भेट म्हणून दिली. तो फारच खूश झाला. म्हणाला, ''मला गोष्टी वाचायला खूप आवडतं.''

त्यानंतर बल्लू दर आठवड्याला आमच्याकडे टी.व्ही. पाहायला येऊ

लागला. अधूनमधून तो बिलाच्या वसुलीलाही येई. हल्ली तो सकाळी पेपरचे वाटप करत नव्हता. त्याची हुशारी पाहून शेटजींनी त्याला, वृत्तपत्रांच्या गाडीतून आलेल्या निरनिराळ्या पेपरांचे विभागवार वाटप करून त्या साऱ्याचा हिशेब ठेवण्याचे अधिक जबाबदारीचे काम दिले होते. बल्लूच्या वयाच्या मानाने ते काम जोखमीचे होते, पण बल्लू ते दक्षतापूर्वक आणि प्रामाणिकपणे करत होता. जेव्हा त्याच्या वयाची मुले साखरझोपेत असत तेव्हा बल्लू आपल्या कामात गुंतलेला असे.

टी.व्ही.वर प्रदर्शित होणारी पशुपक्ष्यांवरील मालिका बंद झाली, तरी बल्लू आमच्याकडे अधूनमधून येतच राहिला. आमच्या घरातील सर्वांची त्याच्याशी एक प्रकारची जवळीक निर्माण झाली. एक दिवस मी लिहिलेले एक पुस्तक तो घेऊन आला नि म्हणाला, "किती छान वाटतं हे पुस्तक वाचताना. तुमचं कोकण किती सुंदर असेल नाही?"

मी म्हणालो, "प्रत्येकाला आपला गाव सुंदर वाटतो. तुझाही गाव असेल ना कुठंतरी? कोकणात नसला तरी देशावर, मराठवाड्यात, विदर्भात, कुठंतरी तुझ्या आईवडिलांचं खेडं असेलच. तू तिथं गेलास तर तोही मुलूख तुला सुंदर वाटेल."

"आम्हांला गावच नाही," तो उदासपणे म्हणाला. "माझे आईवडील खेडं सोडून मुंबईत आले त्याला खूप वर्षं झाली. माझा जन्म तर इथलाच. डोंगर, नदी, कुरणं, झाडं-वेली...झाडांवर स्वच्छंद रमणारे पक्षी — यांपैकी मी काहीही कधी पाहिलेलंच नाही..." मग थोडा वेळ थांबून एकदम तो म्हणाला, "मला न्याल तुमच्या गावी? तुमच्या कौलारू घराच्या अंगणात रात्री पडणारं चांदणं मला पहायचं आहे! मुंबईत आम्ही कधी पौर्णिमेचं चांदणं पाहिलं नाही..."

"बल्लू, मी तुला नेईन माझ्याबरोबर माझ्या कोकणातल्या गावी. तिथं तुला चांदणं पाहता येईल. चांदण्यात मनसोक्त बागडता येईल."

"खरंच?" विश्वास न बसल्यासारखे त्याने मला विचारले.

मी म्हणालो, "खरंच!"

बल्लूच्या डोळ्यांत मी त्या वेळी पौर्णिमेचे चांदणे जणू पाहत होतो.

त्यानंतर लवकरच आम्ही घर बदलले आणि दूरच्या उपनगरामध्ये राहायला गेलो. त्या गडबडीत बल्लूला भेटायचे राहूनच गेले. तोही त्या मुदतीत का कुणास ठाऊक फिरकला नाही. बल्लूला दिलेले वचन माझ्याकडून पूर्ण व्हायचा योग नव्हता.

त्यानंतर बरेच दिवस लोटले. बल्लूच्या आठवणी पुसट होत गेल्या. नवी जागा, नवा परिसर, नवी कामे, नवी माणसे यात चिमुकल्या थेंबासारखा कधीतरी भेटलेला बल्लू हळूहळू हरवून गेला.

असेच दिवस उलटत होते.... आणि एके दिवशी अचानक बल्लू पुन्हा भेटला!

विद्यार्थ्यांसाठी एका मासिकाने लेखनाची स्पर्धा जाहीर केली होती. अनेक नामांकित शाळांतील विद्यार्थ्यांनी त्या स्पर्धेमध्ये भाग घेतला होता. निर्णय जाहीर झाला. त्या स्पर्धेतील विजेत्या बाल-लेखकांच्या पारितोषिक वितरणासाठी मला संयोजकांनी प्रमुख अतिथी म्हणून बोलावले होते. मी स्पर्धेचा निर्णय पाहिला. पहिले पारितोषिक मिळवणाऱ्या विद्यार्थी लेखकाचे नाव होते — 'कुमार बल्लव कदम' आणि त्याच्या लेखाचे शीर्षक होते — 'मला न भेटलेले अंगणातील चांदणे!'

त्या निबंधावरून मी नजर फिरवली. बल्लवने सुरेख अक्षरांत लिहिले होते—

"माझं एक चिमुकलं स्वप्न आहे — कोकणात किंवा कुठेही मुंबई-बाहेरच्या खेड्यात आपलं एक छोटंसं कौलारू घरकूल असावं. त्याला टुमदार अंगण असावं. त्या अंगणात रात्री चंद्राचं शुभ्र शीतल चांदणं रांगत रांगत यावं — नि मी त्याला कडेवर उचलून घ्यावं!"

बक्षीस घेण्यासाठी बल्लू समोर आला. मघापासून त्याला पाहण्यासाठी मी आतुर झालो होतो. गेल्या तीन साडेतीन वर्षांनंतर बल्लू किती वेगळा दिसत

होता! अशक्त, उंच आणि हडकुळा. बल्लूला त्याच्या चमकदार, प्रसन्न हास्यामुळे व पाणीदार डोळ्यांमुळेच मी ओळखू शकलो होतो. बल्लूने माझ्या हातून बक्षीस स्वीकारले. मी त्याच्या पाठीवरून कौतुकाने हात फिरवला. त्याने मला खाली वाकून नमस्कार केला व म्हणाला, ''सर, मला तुमचा पत्ता हवा.''

मी माझ्या पत्त्याचे कार्ड त्याला दिले आणि म्हणालो, ''भेटायला ये या पत्त्यावर, आपल्याला गावी चांदणं पाहायला जायचं आहे ना?''

पण बल्लू आलाच नाही. त्याऐवजी एके दिवशी त्याचे पत्र आले. त्याने आपल्या सुरेख वळणदार अक्षरांत लिहिले होते — ''प्रिय सर, तुम्ही मला वाचनाची गोडी लावलीत. त्यामुळे मला लिहायची हौस वाटू लागली. तुम्ही चांदणं दाखवायला गावी नेणार होता मला, ते मी विसरलो नव्हतो. त्याचीच गोष्ट लिहिली नि पहिलं बक्षीस मिळालं! खरं तर हे सारं तुमच्यामुळं....



तुमचे किती आभार मानू? सर, मी दहावीच्या वर्गात आहे. पण मध्ये खूप घडामोडी घडल्या. माझे बाबा वारले, आई खूप आजारी असते. मी रात्रशाळेत शिकतो. दिवसा नोकरी करतो. आई, भावंडं यांची सारी जबाबदारी आता माझ्यावर आहे. तेव्हा मला तुमच्याबरोबर गावी येता येणं शक्यच नाही. कधीच शक्य नाही.

''सर, काही लोकांच्या आयुष्यात त्यांना उन्हातूनच चालावं लागतं. चांदणं त्यांना भेटतच नाही! तसंच माझं झालं असेल का? पण तुम्ही मला मायेनं, आपुलकीनं म्हणजेच माणुसकीनं वागवलं, त्यातच चांदण्याचा एक कवडसा मला भेटला. तो पुरेसा आहे.

तुमचा नम्र,

बल्लू उर्फ बल्लव कदम''

मी पत्रावर बल्लूचा पत्ता शोधू लागलो. पण बल्लूने पत्ता लिहिलाच नव्हता!

**प्रश्न:**

१. 'थोडं पाणी मिळेल का प्यायला' असे घुटमळत बल्लूने का विचारले?
२. पेपर टाकण्याऐवजी बिल गोळा करण्याचे काम बल्लूला का मिळाले?
३. बल्लूची बढती कशा प्रकारे होत गेली?
४. बल्लूने आपल्या लेखाला 'मला न भेटलेले अंगणातील चांदणे' असे शीर्षक कां दिले?

**स्वाध्याय व उपक्रम**

१. तुम्हांला माहीत असलेल्या वृत्तपत्रांची नावे सांगा.
२. बल्लूचे व्यक्तिचित्र रेखाटा.
३. बल्लूच्या निबंधातील मनाला चटका लावणाऱ्या दोन ओळी लिहा.

खालील वाक्यांतील जाड ठशातील शब्दांच्या जाती ओळखा.

१. आमच्या वस्तीत **एकदोघांकडे** टी. व्ही. आहेत; **पण** ते दार लावून घेतात.
२. **मी** त्याला **पाणी** दिले. ते तो **घटाघट** प्याला.





# २१. विचारधन

१. ध्येयवादी व्हा!

कोणतेही बलिदान फुकट जात नाही. मग त्यापासून ताबडतोब व स्थूल लाभ न का होईना? कोणतेही ध्येय केवळ कष्ट सहन केल्याने आणि बलिदान केल्यानेच बहरते. हुतात्म्यांचे रक्त हेच कोणत्याही तत्त्वाचे बीजारोपण करते हे अमर सत्य आहे.

या नाशवंत जगात प्रत्येक वस्तूचा नाश, रूपाचा बदल आहेच; पण विचार, ध्येय आणि महत्त्वाकांक्षा ही टिकून राहतात. एखाद्या विचारापायी एखादे मानवी शरीर बळी जाईल तर जाईना का; पण तोच विचार त्या मनुष्याच्या मरणानंतर अनेक शरीरांत पुन्हा प्रकट झालेला दिसेल. विकासाच्या गाडीची चाके ही अशीच पुढे पुढे जात असतात आणि एका पिढीचे विचार व आकांक्षा यांचा ठेवा पुढल्या पिढीस प्राप्त होत असतो. इतिहासाची साक्ष घ्या— प्रतिपक्षाचा छळ सहन न करता आणि कसोटीस न उतरता कोणताही विचार प्रत्यक्ष व्यवहारात येऊ शकला नाही, असेच तो सांगेल.

आपणास ज्यासाठी जिव्हाळा वाटतो अशा तत्त्वासाठीच जगणे आणि त्यासाठीच मरणे याहून अधिक संतोष काय आहे? आपले अपुरे राहिलेले कार्य पूर्ण करणारे अनेक आत्मे उत्पन्न करण्याचे सामर्थ्य आपल्या आत्म्यात आहे अशी जाणीव होणे यापेक्षा अधिक समाधान ते काय असणार? आपल्या जीविताचा संदेश पर्वत आणि सरिता यांना उल्लंघून व विस्तीर्ण मैदानावरून वाहत जाऊन आपल्या देशाच्या कानाकोपऱ्यात घुमेल, समुद्रावरून उड्डाण करून तो दूर दूर देशांत पसरेल, यापेक्षा अधिक कोणत्या फलाची अपेक्षा

माणसाने करावी? शांतपणे आपल्या ध्येयाच्या यज्ञकुंडात आपली आहुती देण्यापेक्षा जीवनाचे साफल्य अधिक ते काय असणार?

— नेताजी सुभाषचंद्र बोस

---

२. माझा आदर्श

मी कुणाचा आदर्श पुढे ठेवू, असे एखाद्या विद्यार्थ्याने मला विचारले, तर मी क्षणाचाही विलंब न लावता उत्तर देईन 'आंबेडकरांचा'!

याचे कारण तसेच आहे. समाजाने विद्यामंदिराबाहेर उभ्या केलेल्या जातीत त्यांचा जन्म झाला. घरची परिस्थितीही शिक्षण घेण्याला फारशी अनुकूल नव्हती. कांदाभाकर हे त्यांचे विद्यार्थिदशेतले पंचपक्वान्न. पण अशा प्रतिकूल परिस्थितीतही आंबेडकरांची ज्ञानसंपादनाची तळमळ कधी मंदावली नाही. एम.ए., पीएच डी. होऊन आणि बडोद्याला काही दिवस नोकरी करून ते बॅरिस्टर होण्याकरता इंग्लंडला गेले. तेव्हाची त्यांची तिथली दिनचर्या वाचण्याजोगी आहे. ते म्हणतात, 'मी जिच्याकडे राहात असे ती बाई सकाळी न्याहारीला मला काय देत असेल असे वाटते? एक माशाचा तुकडा, एक कप चहा, एक पावाचा तुकडा आणि कपाळाला गंधाची टिकली लावतात ना? तेवढा जॅम! ते कदन्न खाऊन मी म्युझियममध्ये वाचायला जाई. दुपारचे जेवण घ्यावयास माझ्यापाशी पैसेच नव्हते. तसाच अर्धपोटी मी पाच वाजेपर्यंत वाचीत असे. घरी आल्यावर संध्याकाळचे जेवण— ते जेवण म्हणजे एक कप बॉव्हरीन आणि बटरबिस्किटे! नंतर पुन्हा वाचन! रात्री दहाला कडकडून भूक लागे. मग मी काय खात असे माहीत आहे? माझ्या एका मित्राने मला एक पापडांची करंडी दिली होती. ते भाजण्याकरिता एक पत्र्याचा तुकडा कोठून तरी मी पैदा केला होता, तो माझा तवा! त्यावर भाजलेले चार पापड आणि कपभर दूध, हे

माझे अन्न! असा राहून अठरा अठरा तास अभ्यास करीत होतो मी.'

असा अभ्यास करून आंबेडकरांनी जे पुस्तक लिहिले त्याच्या प्रस्तावनेत त्यांच्या गुरूंनी लिहिले, 'या माझ्या शिष्याकडून मलाही काही शिकता येण्यासारखं आहे.'

— रा. वा. शेवडे

---

३. यज्ञ

आपण शेती करतो, पृथ्वीची झीज होते. ती झिजून आपणास धान्य देते. तिचा कस, तिचे सत्त्व कमी होते. आपण तिची झीज भरून काढली पाहिजे. आपण तिला नांगरून ठेवतो. सूर्याची उष्णता तिच्या आत शिरते. आपण तिच्यात खत घालतो. अशा रीतीने तिचा कस पुन्हा आपण भरून काढतो. आपण पृथ्वीसाठी जी ही झीज सोसली, उन्हात नांगरले, खत ओतून पैसे खर्च केले, ही जी आपण शारीरिक व आर्थिक झीज पृथ्वीसाठी केली, ती झीज उत्कृष्ट पीक देऊन पृथ्वी भरून काढते. ती माझ्यासाठी झिजते, मी तिच्यासाठी झिजतो.

गीतेच्या तिसऱ्या अध्यायात हे महान यज्ञतत्त्व सांगितले आहे. आज मानवी समाजात हे यज्ञतत्त्व पाळण्यात येत नाही, म्हणून मानवी समाज दुःखी आहे. मजुरांनी म्हणायचे, 'शेटजी, तुमच्यासाठी आम्ही यंत्राजवळ झिजतो. सारी संपत्ती तुमच्या हातात देतो, घ्या.' शेटजीने म्हणायचे, 'बंधूंनो! ही सारी संपत्ती पुन्हा तुमच्यासाठी मी देऊन टाकतो, घ्या.' अशा रीतीने समाजात आनंद राहील. परस्पर जर याप्रमाणे वागतील, तर समाजात समता राहील. एकीकडे खळगे व एकीकडे टेकाडे दिसणार नाहीत. एकीकडे प्रचंड प्रासाद व एकीकडे क्षुद्र झोपड्या हे दुःख दिसणार नाही. एकीकडे आनंदमय संगीत तर दुसरीकडे शोकाचे रडगाणे असा हृदयभेदक देखावा दिसणार नाही.

— सानेगुरुजी

४. तरुणाई

तरुण मनाचा मजबूत असावा. कनवाळू असला तरी खंबीर असावा, दृढनिश्चयी असावा. आपण जे ठरविले तेच सत्य आहे, तेच हितकर आहे, तेच प्रसंगाला आवश्यक आहे, असे एकदा ठरल्यानंतर मग त्यापासून तो डगमगत नाही. शेंडी तुटो वा पारंबी तुटो, अशा निश्चयाने आपल्या मार्गाला तो चिकटून राहतो. त्याच्या ठिकाणी नचिकेतसारखी अविचल निष्ठा असते. नचिकेतला भुरळ पाडण्यासाठी यम म्हणतो, 'मी तुला देवदुर्लभ महाल, माड्या, हत्ती, घोडे व इतर वैभव देतो, हवे तेवढे आयुष्य देतो; पण मृत्यूला जिंकण्याची विद्या मजजवळ मागू नकोस.' पण नचिकेत भुलत नाही. तो म्हणतो, 'तू दिलेले माझ्या काय कामाचे? जो देऊ शकतो, तो हिरावू शकतो. तू दिलेले आयुष्य म्हणजे तुझ्या कृपेने प्राप्त झालेले आयुष्य. तुझ्या मेहरबानीवर असलेले आयुष्य म्हणजे मरणाधीन जीवन. मला असले मुर्दाड आयुष्य नको आहे. तुला जिंकणारे, मृत्यूलाही वश न होणारे जीवन हवे आहे.' या मृत्युलोकात मरणाच्या छायेपलीकडले निर्भय जीवनाचे दर्शन ज्याला होते तो तरुण. तो म्हणतो — 'विज्ञान काहीही म्हणो, जीवन कधीच नाहीसे होणार नाही.' मरणाला भिऊन, वैभवाला भुलून, तो जीवनातील उदात्त तत्वांना पारखा होत नाही. अशा शाश्वत जीवनाची बीजे ज्याला समाजात नित्य दिसतात तो तरुण. अशा नचिकेतची पथके आमच्यात उभारली जाऊन 'हम अमर भये, अब न मरेंगे' ची गर्जना करू लागली म्हणजे परिवर्तनाला किती वेळ लागणार? नचिकेत आपल्या निश्चयापासून ढळला नाही. तो म्हणाला, 'यमराजा, तुझ्या हाती नसेल, असे जीवन मला हवे आहे. ते तुला जिंकूनच मला मिळवता येईल!' मरणाला जिंकून जगण्याचा निश्चय करणारे तरुण आज जगाला हवे आहेत.

— दादा धर्माधिकारी



# १. सूक्त एकतेचे

वेद हे जगातील उपलब्ध वाङ्‌मयातील प्राचीन ग्रंथ आहेत. यामध्ये मानवतावादी तत्त्वज्ञान आणि जगाच्या कल्याणासाठी केलेल्या प्रार्थना आहेत. तसेच यातून सुखी जीवनाचा शोध घेण्याचा प्रयत्न केलेला आहे.

प्रस्तुत ऋग्वेदातील सूक्तात एकता, समानता, मैत्री व परस्पर सामंजस्य साधून व्यक्तीची आणि समाजाची प्रगती साधता येते असे प्रतिपादलेले आहे. वेदातील श्लोकांना ऋचा आणि त्या ऋचांच्या समूहांना सूक्त असे म्हणतात.

सोबती तुम्ही मिळुनि चालणे
जुळवुनी मने मिळुनि बोलणे ।।धृ।।
विचार सारखा सारखी मते
हृदय सारखे भावना जुळे
समान मंत्र हा समान धारणा
समान ही मने समा विचारणा ।।१।।
एक होऊनी कार्य साधणे
सहनशीलता अंगि बाणणे
हेच सांगणे हेच मागणे
राष्ट्र घडविणे ब्रीद आपुले ।।२।।
असेल वेदना शल्य वा उरी
शत्रुच्याही ते घालवू दुरी
वागतात जी वेगळेपणे
प्रेम देउनी बदलवू मने ।।३।।

**प्रश्न :**

१. सोबतीने राहून काय काय करण्याचा संदेश या सूक्तात दिला आहे?
२. परस्परांच्या भावना जुळण्यासाठी कोणत्या गोष्टी समान असाव्यात?
३. आपणा सर्वांचे कोणते ब्रीद सूक्तात सांगितले आहे?
४. मन बदलवण्यासाठी कोणता उपाय सूक्तात सांगितला आहे?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. 'सहन'पासून 'सहनशीलता' याप्रमाणे-क्रिया, धर्म, पुण्य आणि गती या शब्दांपासून नवीन शब्द बनवून त्यांचा वाक्यांत उपयोग करा.
२. खालील शब्दांच्या विरुद्धार्थाचे शब्द लिहा.
समान, सहिष्णू, शत्रू, विचार.
३. 'खरा तो एकची धर्म' हे सानेगुरुजींचे गीत मिळवून पाठ करा. यासारखी आणखी काही गीते मिळवा.
४. पाठ्यपुस्तक मंडळाने प्रकाशित केलेल्या 'वंद्य वंदे मातरम्' या पुस्तकातील देशप्रेमावर आधारित गीते पाठ करा.





## २. ऋतुचित्र

शिरीष पै — यांनी कविता, कथा, ललितलेख असे अनेक प्रकारचे लेखन केले आहे.

ही कविता 'ऋतुचक्र' या काव्यसंग्रहातून घेतलेली आहे. या कवितेत वसंतऋतूमध्ये बहरणाऱ्या निसर्गाचे वर्णन केलेले आहे.

रस्ता गेला दूरदूर
झाडे दुतर्फा लागली
पसरली वाटभर
त्यांची विपुल सावली ।।१।।

ऋतू वसंत म्हणून
झाडझाड पल्लवित
जशी प्रत्येक पानात
तेवतसे दिव्य ज्योत ।।२।।

कुठे गुलाबी पोपटी
कुठे दाटला हरित
एक पालवी परंतु
रंग केवढे अनंत ।।३।।

रंग देखता देखता
डोळे आलेत भरून
झुलू लागली पालवी
अंगप्रत्यंगामधून ।।४।।

घमघमला सुगंध
आला परंतु कुठून
अहा! केवढी ही झाडे
पूर्ण गेली मोहरून ।।५।।

गंध कुणाचा कोठला
कसा बाई ओळखावा
एका दमात सारीच
फुले लागली फुलाया ।।६।।

**प्रश्न :**

१. वाटेवर सावली का पडली आहे?
२. वसंतऋतूमुळे निसर्गात कोणकोणते बदल झाले आहेत?
३. गंध कुणाचा हे का ओळखता येत नाही?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. दुतर्फा, अनंत, हरित, घमघमला, मोहरून, पल्लवित यांचा अर्थ सांगून वाक्यांत उपयोग करा.
२. ऋतूंची नावे लिहून त्यांतील प्रत्येकाचे वैशिष्ट्य थोडक्यात लिहा.





# ३. माझ्या गोव्याच्या भूमीत

**बा. भ. बोरकर (बाळकृष्ण भगवंत बोरकर) —** 'प्रतिभा', 'जीवनसंगीत', 'दूधसागर', 'चित्रवीणा', 'चिन्मयी' इत्यादी कवितासंग्रह. कथा, ललितलेख, कादंबऱ्या, चरित्रे असे विविध प्रकारचे लेखन.

बोरकर हे गोव्याचे. गोव्यातील रम्य निसर्गाचे बहारदार वर्णन आणि मायभूमीबद्दल वाटणारा जिव्हाळा त्यांच्या शब्दाशब्दांतून व्यक्त झालेला आहे.

---

माझ्या गोव्याच्या भूमीत
गड्या नारळ मधाचे
कड्याकपारीमधोनी
घट फुटती दुधाचे

माझ्या गोव्याच्या भूमीत
आंब्याफणसांची रास
फुली फळांचे पाझर
फळी फुलांचे सुवास

माझ्या गोव्याच्या भूमीत
उन्हाळ्यात खारा वारा
पावसात दारापुढे
सोन्याचांदीच्या रे धारा

माझ्या गोव्याच्या भूमीत
येते चांदणे माहेरा
ओलावल्या लोचनांनी
भेटे आकाश सागरा

माझ्या गोव्याच्या भूमीत
चाफा पानावीण फुले
भोळाभाबडा शालीन
भाव शब्दावीण बोले

माझ्या गोव्याच्या भूमीत
गड्या साळीचा रे भात
वाढी आईच्या मायेने
सोनकेवड्याचा हात

माझ्या गोव्याच्या भूमीत
लाल माती, निळे पाणी
खोल आरक्त घावांत
शुद्ध वेदनांची गाणी

प्रश्न :

१. या कवितेत फळाफुलांची कोणती वैशिष्ट्ये सांगितली आहेत?
२. कवीने उन्हाळ्याचे, पावसाळ्याचे वर्णन कसे केले आहे?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील कल्पना स्पष्ट करा.
येते चांदणे माहेरा, सोनकेवड्याचा हात, शुद्ध वेदनांची गाणी.
२. खारा वारा, गोड व्यथा या शब्दसमूहांचा वाक्यांत उपयोग करा.
३. 'माझा गाव' या विषयावर छोटेसे भाषण तयार करा व वर्गात सादर करा.





# ४. पाणी-पाणी

इंदिरा संत — 'मेंदी', 'शेला', 'मृगजळ', 'गर्भरेशीम' इत्यादी कवितासंग्रह आणि 'शामली' व 'कदली' कथासंग्रह होत.

प्रस्तुत कविता 'गर्भरेशीम' या संग्रहातून घेतलेली आहे. दारिद्र्य आणि सामाजिक विषमता यांपायी आई आणि मुलांची होणारी होरपळ हा या कवितेचा विषय आहे. कवितेत भावनांची आर्तता आणि कोवळिकता जाणवते.



वर कोऱ्या आभाळाची
भट्टी तापली तापली,
खाली लेकरांची माय
वारा पदराने घाली.

वाऱ्याखाली कसेबसे
उभे रोप जवारीचे,
एक मलूल पोपटी
दोन सुकल्या पात्यांचे.

उभी कोणाच्या दारात
रांग भुकेल्या बाळांची,
थाळा वाडगा घेऊन
अशी तिष्ठत केव्हाची.

पोरक्या या अर्भकांना
एक पाणी का मिळेना,
उभा डोळ्यामधे थेंब
तो का सुकून जाईना.

**प्रश्न :**

१. आई आपल्या लेकराला पदराने वारा का घालत आहे?
२. दारिद्र्यामुळे आईचे व मुलांचे काय काय हाल झाले?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. स्पष्टीकरण करा.
कोऱ्या आभाळाची भट्टी.
उभा डोळ्यामध्ये थेंब तो का सुकून जाईना.
२. मलूल, तिष्ठणे, पोरके यांचा वाक्यांत उपयोग करा.
३. दुष्काळामुळे जनावरांची आणि माणसांची अवस्था कशी होते ते दहा वाक्यांत लिहा.
४. दुष्काळामुळे लोकांना रोजगार मिळावा, यासाठी तहसीलदारांना एक अर्ज लिहा.
५. पाणीसमस्येवर मात करण्यासाठी तुमच्या गावातील लोकांनी गावतळी किंवा पाझर तलाव बांधून पावसाच्या पाण्याची योग्यरीतीने साठवण केली असल्यास त्याबाबतची माहिती वर्गात सांगा.



# ५. संतवाणी

**संत तुकाराम —** हे एक महाराष्ट्रातील थोर संत. प्रस्तुतच्या अभंगात भोंदूगिरीवर तुकारामांनी कोरडे ओढलेले आहेत आणि सामान्यजनांना जागरूक राहण्याविषयी बजावले आहे.

ऐसे कैसे झाले भोंदू।
कर्म करोनी म्हणती साधू।।
अंगा लावूनिया राख।
डोळे झाकुनी करिती पाप।।
दावुनी वैराग्याची कळा।
भोगी विषयांचा सोहळा।।
तुका म्हणे सांगो किती।
जळो तयांची संगती।।

**संत बहेणाबाई —** तुकाराम महाराजांच्या शिष्या.
'बीज तसे फळ' हा निसर्गाचा नियम आहे. कुणाला कडूपणा तर कुणाला माधुर्य लाभलेले आहे. पण केवळ यामुळेच कुणी चांगला किंवा वाईट ठरत नाही. नीट परीक्षा करूनच ते ठरवावे, हे या अभंगात सांगितले आहे.

निंबा कडुपण देत असे कोण। युक्षा गोडपण कवण करी।।
बीज तैसे फळ गोडीचा निवाड। हा अर्थ उघडा दिसतसे।।
इंद्रावनामुळी कोण घाली विष। अमृत आम्रास देत कवण।।

बचनागा आंगी विष कोण लावी। सुगंधता द्यावी नलगे पुष्पा।।
तीक्ष्ण मोहरी करितसे कोण। खारीक निर्माण मधुर का हो।।
बहेणि म्हणे बीज ऐसे येते फळ। उत्तम वोंगळ परीक्षावे।।



**प्रश्न :**

१. 'तुकाराम महाराजांच्या मते समाजात भोंदूगिरी कशी चालते?
२. भोंदूगिरीविषयी कोणती सावधानता बाळगावी?
३. 'बीज तैसे फळ' हे स्पष्ट करण्यासाठी कवयित्रीने कोणकोणती उदाहरणे दिली आहेत?
४. 'उत्तम वोंगळ परीक्षावे' असे कवयित्री का म्हणते?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. 'बीज तैसे फळ' या कल्पनेचा विस्तार करून एक परिच्छेद लिहा.
२. या अभंगांचे सार प्रत्येकी दोन वाक्यांत लिहा.



# ६. सागरास

**वि. दा. सावरकर (विनायक दामोदर सावरकर)** — एक थोर क्रांतिकारी देशभक्त. कादंबरी, निबंध, कविता, नाटके, इतिहास अशा अनेक क्षेत्रांतील स्वातंत्र्यवीर सावरकरांची वाङ्मयीन कामगिरी मोलाची आहे. 'कमला', 'सप्तर्षी', गोमांतक' ही सावरकरांची काही खंडकाव्ये. 'काळेपाणी' ही कादंबरी. 'संन्यस्त खड्ग' हे नाटक. '१८५७ चे स्वातंत्र्यसमर' हा ऐतिहासिक ग्रंथ.

हे एक देशभक्तीचे अप्रतिम व अनन्यसाधारण गीत आहे. इंग्लंडमधील ब्रायटनच्या समुद्रकिनाऱ्यावर बसले असता मातृभूमीच्या आठवणीने अस्वस्थ होऊन हे सागरसूक्त त्यांनी लिहिले.

ने मजसी ने परत मातृभूमीला। सागरा, प्राण तळमळला
भूमातेच्या चरणतला तुज धूता। मी नित्य पाहिला होता
मज वदलासी अन्य देशि चल जाऊ। सृष्टिची विविधता पाहू
तइं जननी-हृद् विरहशंकितहि झाले। परि तुवां वचन तिज दिधले
मार्गज्ञ स्वये मीच पृष्ठि वाहीन। त्वरित या परत आणीन
　　　　विश्वसलो या तव वचनी। मी
　　　　जगदनुभव-योगे बनुनी। मी
　　　　तव अधिक शक्त उद्धरणी। मी
येईन त्वरे कथुन सोडिले तिजला। सागरा, प्राण तळमळला ।। १ ।।

शुक पंजरि वा हरिण शिरावा पाशी। ही फसगत झाली तैशी
भूविरह कसा सतत साहु या पुढती। दशदिशा तमोमय होती
गुण-सुमने मी वेचियली या भावे। की तिने सुगंधा घ्यावे
जरि उद्धरणी व्यय न तिच्या हो साचा। हा व्यर्थ भार विद्येचा

ती आम्रवृक्षवत्सलता। रे
नवकुसुमयुता त्या सुलता। रे
तो बाल गुलाबहि आता। रे
फुलबाग मला हाय पारखा झाला। सागरा, प्राण तळमळला ।। २ ।।

नभि नक्षत्रे बहुत एक परि प्यारा। मज भरतभूमिचा तारा
प्रासाद इथे भव्य परी मज भारी। आइची झोपडी प्यारी
तिजवीण नको राज्य, मज प्रिय साचा। वनवास तिच्या जरि वनिचा
भुलविणे व्यर्थ हे आता। रे
बहु जिवलग गमते चित्ता। रे
तुज सरित्पते। जी सरिता। रे
तद्विरहाची शपथ घालितो तुजला। सागरा, प्राण तळमळला ।। ३ ।।

या फेन-मिषे हससि निर्दया कैसा। का वचन भंगिसी ऐसा?
त्वत्स्वामित्वा सांप्रत जी मिरवीते। भिउनि का आंग्लभूमीते?
मन्मातेला अबल म्हणुनि फसवीसी। मज विवासनाते देशी
तरि आंग्लभूमि-भयभीता। रे
अबला न माझिही माता। रे
कथिल हे अगस्तिस आता। रे
जो आचमनी एक क्षणि तुज प्याला। सागरा, प्राण तळमळला ।। ४ ।।

प्रश्न :

१. कवीने सागराला कोणकोणत्या आठवणी करून दिल्या आहेत? कशासाठी?
२. हे काव्य वाचताना कोणकोणते भाव उफाळून येतात व कसे?
३. कवीने मातृभूमीबद्दलचे प्रेम कसे व्यक्त केले आहे?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. 'जरि उद्धरणी व्यय न तिच्या हो साचा। हा व्यर्थ भार विद्येचा' या कल्पनेचा विस्तार करून एक परिच्छेद लिहा.
२. खालील ओळीतील कल्पना स्पष्ट करा.
शुक पंजरि वा हरिण शिरावा पाशी।
या फेन-मिषे हससि निर्दया कैसा।
तरि आंग्लभूमि-भयभीता। रे
जो आचमनी एक क्षणि तुज प्याला।
३. 'स्वतंत्रतेचे स्तोत्र' ही सावरकरांची कविता मिळवून पाठ करा.



# ७. किनारा

विद्याधर सीताराम करंदीकर — एक नवोदित कवी. वृत्तपत्रांतून प्रासंगिक लिखाण व कविता प्रकाशित.

सागराचे निळे पाणी, सभोवर नाद पसरवणाऱ्या उसळत्या लाटा, मध्येच उडणारा समुद्रपक्षी व भरकटलेली होडी यांचे चित्र कवीने रेखाटले आहे. त्याचबरोबर त्या विशाल समुद्राचा किनारा मात्र खिन्नपणे आपल्या अंतःकरणातील वेदना व्यक्त करत आहे.

---

घननीळ सागराचा घननाद येत कानी
घुमती दिशादिशांत लहरींमधील गाणी
चौफेर सूर्यज्वाला, वारा अबोल शांत
कोठे समुद्रपक्षी गगनी फिरे निवांत
आकाश तेजभारे माडांवरी स्थिरावे
भटकी चुकार होडी लाडात संथ धावे
वाळूत स्तब्ध झाला रेखाकृती किनारा
जवळी असून पाणी अतृप्त तो बिचारा
जलधीबरोबरीचे आभासमान नाते
त्याची न त्यास धरती, संकेत फक्त खोटे
सान्निध्य सागराचे, आकाश पांघराया
परि साथ ना कुणाची अस्तित्व सावराया

**प्रश्न :**

१. हे वर्णन समुद्राचे आहे, असे कोणकोणत्या गोष्टींवरून लक्षात येते?

२. किनारा हा समुद्राचाच असूनही त्याचे नाते समुद्राशी आभासमान आहे असे का म्हटले आहे?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील ओळींचा अर्थ स्पष्ट करा.

घुमती दिशादिशांत लहरींमधील गाणी.
भटकी चुकार होडी लाडात संथ धावे.
वाळूत स्तब्ध झाला रेखाकृती किनारा.

२. वारा, सूर्य, सागर, आकाश यांचे प्रत्येकी समानार्थी दोन दोन शब्द सांगा.

३. समुद्राचे वर्णन, मित्राला पत्रातून लिहा.

४. समुद्र आणि नदी यांच्यातील संवाद थोडक्यात लिहून तो वर्गात सादर करा.

५. सागरापासून मिळणाऱ्या संपत्तीची माहिती लिहा.





# ८. प्रकाश

**वा. रा. कांत —** 'रुद्रवीणा', 'अग्निपथ', 'शततारका', 'वाजली विजेची टाळी', 'वेलांटी', 'दोनुली' इत्यादी कवितासंग्रह.

जीवनातील अंधार घालवायला बाहेरचा प्रकाश कधीही उपयोगी पडणार नाही. त्यासाठी मनोबल पाहिजे. मन चैतन्याने भरलेले पाहिजे आणि अन्यायाची चीड यायला पाहिजे. जे आर्थिक दृष्ट्या गांजलेले आहेत आणि इतर प्रकारांनी पीडित आहेत त्यांच्यासाठी तुमच्या मनात दया निर्माण झाली पाहिजे. त्यांचे दुःख पाहून तुमचे मन हळहळले पाहिजे आणि त्यांची दयनीय अवस्था घालवण्यासाठी तुम्ही जोमाने पुढे आले पाहिजे. या सर्व भावनांचा प्रकाश हाच कवीला अभिप्रेत असलेला प्रकाश आहे.

---

चाल, चाल, अंधारातचि, चाल एकटाची
पाहशील कुठवर तरुणा, वाट प्रकाशाची?
दीप,सोबती कुणी न
तम तुफान ये उठून
जणु हरील दृष्टि-प्राण आज एकदाची ।।१।।

कंटक वा शूल तेथ
जरि पथात रोविलेत
भीति येथुनी कशास भावी संकटांची ।।२।।

दमन, दैन्य हे बघून
मन रडेल पिळवटून
अश्रुने परी न विझव ज्योत तू मनाची ।।३।।

चमकति तव अस्थीतून
तेच अग्निकण अजून
जागविली ज्योति ज्यांनी सूर्यमालिकांची! ।।४।।

श्रवुन पीडिताक्रंदन
धुपु दे तव हृदय तरुण
वाट ते प्रकाशिल तुझी जाळ पेटताची ॥५॥



**प्रश्न :**

१. मार्ग चालताना तरुणाच्या पुढे कोणती संकटे उभी राहतील?
२. समाजातील दैन्य पाहून तरुणाने काय करावे?
३. कवी तरुणास कोणता संदेश देत आहे?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील कल्पनांचे स्पष्टीकरण करा.
'अश्रुने परी न विझव ज्योत तू मनाची'
'धुपु दे तव हृदय तरुण'
'जागविली ज्योति ज्यांनी सूर्यमालिकांची'
२. कंटक, शूल, दमन, पीडिताक्रंदन यांचे अर्थ सांगून वाक्यांत उपयोग करा.
३. भा. रा. तांबे यांची 'घन तमी शुक्र बघ राज्य करी' ही कविता वाचा.
४. 'तू चाल पुढं तुला रे गड्या भीती कशाची' हे गीत मिळवून वाचा.





# १. तुतारी

**केशवसुत (कृष्णाजी केशव दामले)** — कवितेत सामाजिक विचार मांडणारे हे आद्यकवी होत, 'केशवसुतांची कविता' या पुस्तकात यांच्या सर्व कविता समाविष्ट आहेत. त्यांच्या कवितेत मानवता, बंधुता, समता व सामाजिक न्याय ही मूल्ये आढळतात.

'तुतारी' या कवितेत समाजाला नव्या जाणिवा स्वीकारण्याचे आवाहन करण्यात आले आहे. जुन्या टाकाऊ परंपरा व रूढी यांना मागे सारून, समाजाने प्रगतीच्या वाटेने उत्साहाने जावे, असा संदेश या कवितेत आहे.

एक तुतारी द्या मज आणुनि,
फुंकिन जी मी स्वप्राणाने,
भेदुनि टाकिन सगळी गगने,
दीर्घ जिच्या त्या किंकाळीने,
अशी तुतारी द्या मजलागुनि ।। १ ।।

जुने जाउ द्या मरणालागुनि,
जाळुनि किंवा पुरुनी टाका,
सडत न एका ठायी ठाका,
सावध! ऐका पुढल्या हाका,
खांद्यास चला खांदा भिडवुनि ! ।। २ ।।

प्राप्तकाल हा विशाल भूधर,
सुंदर लेणी तयात खोदा.
निजनामे त्यांवरती नोंदा,
बसुनी का वाढविता मेदा?
विक्रम काही करा, चला तर ।। ३ ।।

हल्ला करण्या ह्या दंभांवर– ह्या बंडांवर
शूरांनो! या, त्वरा करा रे!
समतेचा ध्वज उंच धरा रे!
नीतीची द्वाही फिरवा रे!
तुतारिच्या या सुराबरोबर. ॥४॥



**प्रश्न :**

१. 'एक तुतारी द्या मज आणुनि' असे कवी कशासाठी म्हणत आहे?
२. कवी कोणता नवा विक्रम करण्याविषयी सुचवतो?
३. तुतारीच्या सुराबरोबर काय काय करावे असे कवी सुचवतो?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. 'सडत न एका ठायी ठाका', 'नीतीची द्वाही फिरवा रे' यांतील कल्पना स्पष्ट करा.
२. 'जुने जाऊ द्या मरणालागुनि' या ओळीचा आशय स्पष्ट करणारा परिच्छेद तयार करा.
३. वसंत बापट यांची 'शिंग फुंकिले रणी' ही कविता वाचा आणि पाठ करा.





# १०. मी फूल तृणातिल इवले

**मंगेश पाडगावकर —** 'धारानृत्य', 'जिप्सी', 'छोरी', 'मीरा', 'सलाम' इत्यादी काव्यसंग्रह प्रसिद्‌ध आहेत.

ही कविता 'जिप्सी' या काव्यसंग्रहातून घेतलेली आहे.

दाहक सत्तेला भिऊन त्यापुढे नमायचे नाही. आपला बडेजाव विसरून मैत्रीच्या भावनेने कुणी हात पुढे केला तरच त्याच्याशी सख्य जोडावे, हे या कवितेत गवतफुलाच्या रूपाने कवी सांगतो.

जरि तुझिया सामर्थ्याने
ढळतील दिशाही दाही
मी फूल तृणातिल इवले
उमलणार तरिही नाही

शक्तीने तुझिया दिपुनी
तुज करितिल सारे मुजरे
पण सांग कसे उमलावे
ओठातिल गाणे हसरे?

जिंकील मला दवबिंदू
जिंकील तृणाचे पाते
अन् स्वतःस विसरुन वारा
जोडील रेशमी नाते

कुरवाळित येतिल मजला
श्रावणातल्या जळधारा
सळसळून भिजली पानें
मज करितिल सजल इशारा

रे तुझिया सामर्थ्याने
मी कसे मला विसरावे?
अन् रंगांचे गंधांचे
मी गीत कसे गुंफावे?

शोधीत धुक्यातुन मजला
दवबिंदू होऊनि ये तू
कधि भिजलेल्या मातीचा
मृदु सजल सुगंधित हेतू!

तू तुलाच विसरुन यावे
मी तुझ्यात मज विसरावे
तू हसत मला फुलवावे
मी नकळत आणि फुलावे.



**प्रश्न :**

**अ.** १. लहानसे फूल आपला कोणता भाव व्यक्त करते?

२. तृणफुलाला सारे केव्हा मुजरे करतील?

३. तृणफुलाशी वारा केव्हा नाते जोडील?

**आ.** खालील अर्थांचे कवितेत आलेले शब्द लिहा.

फार लहान, नमस्कार, संकेत, वास, मऊ.

**इ.** खालील कल्पना स्पष्ट करा.

१. तू तुलाच विसरुन यावे
मी तुझ्यात मज विसरावे

२. कधि भिजलेल्या मातीचा
मृदु सजल सुगंधित हेतू!

३. अन् स्वतःस विसरून वारा
जोडील रेशमी नाते

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. तृणातील फुलाचा बाणेदारपणा तुमच्या शब्दांत लिहा.

२. तृणातील फूल शक्तीला कोणते आवाहन करते, ते स्पष्ट करा.

३. 'शिवराय आणि बालवीर' ही वा. भा. पाठक यांची कविता पाठ करून वर्गात साभिनय सादर करा.

४. पहाटेच्या वेळी गवतावरून अनवाणी चालण्याचा अनुभव घ्या व तो इतरांना सांगा.

५. माळरानावर फुलणाऱ्या रानफुलांचे निरीक्षण करून त्यांची नावे माहीत करून घ्या.





# ११. दुपार

सदानंद रेगे (सदानंद शांताराम रेगे) — 'अक्षरवेल', 'गंधर्व' हे काव्यसंग्रह. 'चंद्र सावली चोरतो' हा कथासंग्रह.

ही कविता 'अक्षरवेल' या काव्यसंग्रहातून घेतलेली आहे. दुपारचे निसर्गवर्णन या कवितेतून प्रभावीपणे केले आहे.

माथ्यावरती उन्हे चढावी
पावलात सावल्या विराव्या
घाटावरती शुभ्र धुण्यांच्या
पाकोळ्या अन् मंद झुलाव्या

डोंगर व्हावे पेंगुळलेले
पोफळबागा सुस्त निजाव्या
अंगणातल्या हौदावरती
तहानलेल्या मैना याव्या

लुकलुकणारे गोल कवडसे
निंबाच्या छायेत बसावे
खारीचे बावरे जोडपे
बकुळीखाली क्षणिक दिसावें

कुरणाच्या हिरवळीत ओल्या
ऊनहि हिरवे होउन जावे
कुठे कधीचे नांगरलेले
शेत पावसासाठि झुरावे

**प्रश्न :**

१. कवितेत भर दुपारचे वर्णन आहे हे कशावरून सूचित होते?
२. दुपारमुळे कोणाकोणाला सुस्तावस्था आलेली आहे?
३. हिरव्या कुरणाच्या उन्हावर झालेल्या परिणामाची कल्पना स्पष्ट करा.
४. कवीने केलेले दुपारचे वर्णन तुमच्या शब्दांत लिहा.

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. चढण, सुस्त, मंद, शुभ्र यांचे विरुद्धार्थी शब्द लिहा.
२. पेंगुळलेले, कवडसे, घाट, सुस्त या शब्दांचा वाक्यांत उपयोग करा.
३. मैना, डोंगर, खारीचे जोडपे, धुणी या नामांसाठी कवितेत आलेली विशेषणे सांगा.
४. 'सकाळ' या विषयावर पंधरा ओळी लिहा.
५. कवितेत आलेल्या झाडांची व पक्ष्यांची माहिती मिळवा.





# १२. जीवितमहिमा

**विनायक (विनायक जनार्दन करंदीकर)** — 'विनायकाची कविता' या नावाने यांच्या कविता संग्रहित केलेल्या आहेत. आशावादी राष्ट्रीय सूर आणि देशप्रेमाचे धडे त्यांच्या कवितेतून मिळतात.

जीवनात येणाऱ्या संकटांना तोंड देत देत पुढे जावे. आपण गेल्यावरही जगात आपली काहीतरी कीर्ती राहावी, शेवटी या मातृभूमीला श्रेष्ठ समजून कार्य करत राहावे, असे या कवितेत सांगितले आहे.

आहे जीवितयुद्ध विश्वसमरी मोठे सदा चालले.
धीरे त्यात लढून, नाव जगती ह्या गाजवा चांगले,
गोते खाल, न चालवा-विनवितो-त्या मेंढरांचे व्रत,
गेल्याचाच करीत शोक बसणे वाईट ही पद्धत. ।। १ ।।

झाले आजवरी महापुरुष जे त्यांची चरित्रे पहा.
'व्हावे आपणही तयांसम' -तुम्हां लाभेल हो! बोध हा.
जाताना जग सोडुनी, उमटवा मागे पदे आपुली -
काळाच्या पुलिनी जनांस सरणी घालून द्या चांगली. ।। २ ।।

यासाठी, कर जोडुनी बसु नका — बांधा कशी कंबर.
घाला भीक न संकटा — प्रतिदिनी यत्नास व्हा सादर.
भाषा प्राकृत उन्नतीस चढवा — काया करा अर्पण —
आर्यावर्तहितास द्या सतत सत्कार्यास उत्तेजन. ।। ३ ।।

**प्रश्न :**

१. कवीच्या मतानुसार जीवनाचा सदुपयोग कोणत्या प्रकारे करावा?
२. महापुरुषांच्या चरित्रापासून कोणता बोध घ्यायचा आहे?
३. संकटांवर मात करण्यासाठी काय करायला कवी सांगतो?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. विश्वसमर, व्रत, सरणी या शब्दांचा अर्थ सांगून वाक्यांत उपयोग करा.
२. नाव गाजवणे, कंबर कसणे, भीक न घालणे, काया अर्पण करणे, कर जोडून बसणे, गोते खाणे या वाक्प्रचारांचा वाक्यांत उपयोग करा.
३. 'थांबला तो संपला' यावर एक परिच्छेद लिहा.
४. मेंढराचे व्रत, मागे पदे उमटवणे, प्राकृत भाषेची उन्नती या कल्पनांचे स्पष्टीकरण करा.
५. काही थोर पुरुषांच्या चरित्रांतील चित्तथरारक प्रसंग लिहा.

# शब्दार्थ

## गद्य – विभाग

### १. दमडी

**अडत्या** – दलाल
**उडानखटुला** – विमान
**ऊब** – उष्णता
**चिटपाखरू नसणे** — कुणीही नसणे
**चंदी** — रतीब
**चुंबळ** – डोक्यावर ठेवायची कापडाची गुंडाळी
**जीर्ण** – जुने
**झेप** – उडी
**ठेका** – मक्ता
**तोंडी लावणे** – चव यावी म्हणून पूरक पदार्थ खाणे
**दीडदमडीचा** — क्षुल्लक, किंमत नसलेला
**धूसर** – अस्पष्ट
**पोरसवदा** – पोरासारखे, अगदीच लहान
**फटकूर** — चिरगूट
**मुंडासे** – डोक्याला बांधलेले फडके
**विस्तीर्ण** – लांब-रुंद, ऐसपैस
**संगीन** – बंदुकीच्या टोकास लावलेले तीक्ष्ण हत्यार
**हडकुळा** – रोड, बारीक

### २. ठोकळ्याचे चित्र

**आ वासणे** – आश्चर्याने पाहणे
**कठोर** – कडक
**चहाडी** – चुगली, लावालावी
**जाणीव** – समजूत, ज्ञान
**वरमणे** – खिन्न होणे
**शरमणे** – लाजणे
**हशा पिकणे** – खूप हसणे

### ३. अहमदभाई

**अपेक्षा** – इच्छा
**अब्रू** – मान
**कसम** – शपथ
**कळा** – शोभा
**कुपी** – बाटली
**खुदा** – ईश्वर
**खुशबू** – सुगंध
**गुप्ती** – एक प्रकारचे शस्त्र
**तुफान** – खूप
**दर्दी** – जाणकार
**दिलदार** – मोठ्या मनाचा
**दुर्मिळ** – मिळावयास कठीण
**परागंदा** – गाव सोडून गेलेला
**मग्न** – गुंतलेले
**रुबाब** – ऐट
**रेशमी भराव** – रेशमाचे नक्षीकाम

**लगबगीने** – घाईघाईने
**व्यक्तित्व** – माणसाचे वैशिष्ट्य
**शान** — शोभा
**सचिंत** – काळजीत पडलेला
**सदासर्वकाळ** – नेहमी
**सोन्याचा मुलामा** – सोन्याचे पाणी
**चेहरा उतरणे** – उदास होणे
**फिके पडणे** – कमीपणा येणे

## ४. गोकुळ

**उठाठेव** – उपद्व्याप
**खडे फोडणे** – दोष लावणे
**खूणगाठ** – आठवण ठेवण्यासाठी बांधलेली गाठ
**तात बांधणे** – फास लावणे
**पान न हालणे** – अगदीच अडणे
**पोशिंदा** – पोसणारा
**पांघरूण घालणे** – झाकणे
**ब्याद** – कटकट
**म्हशीची शिंगे म्हशीला जड होत नाहीत** – आपली माणसे आपल्याला जड होत नाहीत.
**वाघ पाठीस लागणे** – घाबरणे
**सार्थक होणे** – सफल होणे
**स्मरणशक्ती** – लक्षात ठेवण्याची शक्ती
**हात धुऊन पाठीस लागणे** – एकसारखा त्रास देणे

## ५. पावसाळा आला

**अत्याधुनिक** – अगदी नवीन
**अनवाणी** – पायांत काही न घालता
**अंतर्बाह्य** – आतून-बाहेरून
**क्रोध** – राग
**गुजराण** – निर्वाह
**पागोळ्या** – छपराखालची धार
**पादत्राण** – पायाच्या रक्षणाचे साधन
**प्राशन** – पिणे
**भेडसावू लागणे** – भिववू लागणे
**मेघराज** – मोठे ढग
**सहप्रवासी** – सोबत प्रवास करणारा
**स्नेह** – मित्रत्व
**सामान्येतर** – सामान्यांहून वेगळे
**क्षणभंगुर** – क्षणात नाश पावणारे, फार काळ न टिकणारे

## ६. देवगुणी लक्ष्मी

**आर्थिक** – पैशासंबंधी
**कावा** – डाव
**दृढ** – पक्का
**देवगुणी** – उत्तम गुण असलेली
**बोर्डिंग** — वसतिगृह
**पाठ थोपटणे** – शाबासकी देणे
**मेटाकुटीला येणे** — त्रासणे
**लंकेची पार्वती** – अंगावर एकही अलंकार नसलेली सुवासिनी स्त्री

## ७. घर

**असन त्त** – असेल तर

**इतवारी** – नागपूर शहराच्या एका वस्तीचे नाव
**एन्यापरत** – प्रत्येक येण्याच्या वेळी
**येर्हिच्या** – त्यांच्या
**अयन्याचं** — आरशाचे
**कायचं** – कशाचं
**काहून** – का बरे
**कांडके** – तुकडे
**केस** – खटला
**गोकुळ** – मुलाबाळांनी भरलेले घर
**घराचा वास्तू** – नवे घर बांधले की करायचा एक धार्मिक विधी
**डुबणे** – बंद पडणे
**तुहे** – तुझे
**तईच** – तेव्हाच
**धाब्यावर** – मातीचा लेप देऊन तयार केलेल्या माडीवर किंवा माळ्यावर
**पिशी** – वेडी
**बर्डी** – नागपूर शहराच्या एका वस्तीचे नाव
**बाप्राव** – बापूराव
**मस्कासाथ** – नागपूर शहराच्या एका वस्तीचे नाव
**माहं** – माझं
**मुंगन्याच्या शेंगा** – शेवग्याच्या शेंगा
**लेकराईस** – मुलांना
**वदनी कवळ घेता** – तोंडी घास घेताना
**यातायात** – कष्ट
**सौदा** – देवघेव

## ८. आमचे अन्नदाते

**अवकाश** – वेळ
**गाफील** – बेसावध
**घोडचूक** – मोठी चूक
**चऱ्हाट बंद करणे** – सतत चाललेली बडबड बंद करणे
**ताबेदार** – ताब्यात ठेवणारा
**फर्मावा** – आज्ञा करा
**बेफिकीर** – निष्काळजी
**माफक** – योग्य

## ९. दौलत

**अधीर** – उतावीळ
**अस्वस्थ** – बेचैन
**उद्दामपणा** – उद्धटपणा
**घायाळ** – जखमी
**जातिवंत** – अस्सल, हाडाचा
**तढव** - अंथरण्याचे जाड कापड
**दिरंगाई** – उशीर
**दौलत** – संपत्ती
**धर्म पाळणे** – कर्तव्य पार पाडणे
**निर्धार** – निश्चय
**निवांत** – शांत
**मूर्च्छा** – बेशुद्धी
**मेहरबानी** – कृपा
**यातना** – दुःख, कष्ट, त्रास
**वजनदार** – छाप पडेल असा
**व्याकूळ** — वेदनांनी पीडित झालेला

## १०. शांततेसाठी

**अधिष्ठित** - आधारलेले
**अभिनिवेश** - दुराग्रह
**आत्मज्ञान** - आत्म्याविषयीचे ज्ञान
**नि:संशय** - संशयरहित
**महात्म्य** - मोठेपणा
**सोऽहम्** - तो मी आहे

## ११. ऊर्जाराणी

**अभाव** — कमतरता,उणीव
**देणगी** – दान
**भविष्य** – पुढे घडणारी गोष्ट
**लयलूट होणे** —भरपूर प्रमाणात मिळणे
**वचन** – शपथ
**विध्वंस** – नाश
**सौर ऊर्जा** –सूर्यापासून मिळवलेली शक्ती

## १२. थोर स्वातंत्र्यसेनानी

**अमोघ** – कधीही व्यर्थ न जाणारे
**अलौकिक** – असामान्य
**एकांतवास** –एकटे राहणे
**कुशाग्र बुद्धिमत्ता** –प्रखर बुद्धिमत्ता
**गुलामगिरी** – पारतंत्र्य
**प्रयाण** –जाणे, गमन
**मंत्रमुग्ध** –भारावलेले
**रणरागिणी** – पराक्रमी स्त्री
**राजदूत** – दुसऱ्या देशातील आपला वकील
**वक्तृत्व** – बोलण्याची कला
**संग्राम** – युद्‌ध

## १३. सुईचे आत्मवृत्त

**इजा** – जखमं
**कंबक्ती काढणे** – खरडपट्टी काढणे
**टिपे** – अश्रू
**नेढे** –सुईचे छिद्र
**पंगू** – लंगडा

## १४. कृष्णामाई

**उदी रंग** – पिंगट, तपकिरी रंग
**उन्माद** – धुंदी
**धुरंधर** – निपुण, तरबेज
**प्रचलित** – चालू
**मनसोक्त डुंबणे** - मनाचे समाधान होईपर्यंत पोहणे
**माहात्म्य** – मोठेपण
**वाक्प्रवाह** — बोलण्याचा ओघ
**वीतराग** – विरक्त, अनासक्त
**संगम** – दोन नद्या मिळण्याचे ठिकाण
**हृदयात कोरलेले** –अंत:करणात ठसलेले

## १५. पावनखिंड

**गनीम** – शत्रू
**छावणी** – लष्कराचा तळ
**शर्थ** –पराकाष्ठा
**प्रतिकार करणे** – विरोध करणे

**प्रहर** – सबंध दिवसाचा आठवा भाग
**फिरंग** - तलवार
**विटा** – एक प्रकारचे शस्त्र
**शिबंदी** – सैन्य
**संजाब** – शेंडीभोवतालचा घेरा
**हताश** – निराश

## १६. अडाणी

**चितागती** – चिंताग्रस्त
**थटणे** – थांबणे
**वाचा** – वाणी, बोलणे
**सांगावा** – निरोप
**हयात** – आयुष्य

## १७. पत्र

**अनुकंपा** – दया, करुणा
**कुळधर्म** – कुटुंबातील रीतिरिवाज
**गहिवर दाटणे** - रडू येणे
**बिजवर** – दुसऱ्यांदा लग्न करणारा
**मनोवेधक** – मन आकर्षून घेणारे
**साक्षात्कार** – प्रत्यक्ष ज्ञान
**सुसंस्कृत** – सदाचारी

## १८. सुख पर्वताएवढे

**आस्वाद** – चव
**उक्ती** – वचन
**कसोटी** – परीक्षा
**जवापाडे** – अत्यल्प
**धमक** – बळ, शक्ती
**पुरुषार्थ** – पराक्रम
**पैलू** – बाजू
**व्यंग्यचित्र** – टीकात्मक चित्र
**वृत्ती** – स्वभाव
**विलक्षण** – अलौकिक
**सुतकी** – दुःखी

## १९. भूकंप

**कॅनॉपी** — सज्जा.
**भूकंपप्रवण क्षेत्र** —
जिथे पुन्हा पुन्हा
भूकंपाचे धक्के बसतात
तो भूप्रदेश.
**रुडकी** — उत्तर प्रदेशातील सहारनपूर
जिल्ह्यातील गाव.

## २०. मनातले चांदणे

**जोखीम** — जबाबदारी
**वितरण** — वाटप.

# पद्य - विभाग

## १. सूक्त एकतेचे

**धारणा** – बुद्धी
**ब्रीद** – व्रत, बाणा
**विचारणा** – विचार
**शल्य** – टोचणारे दुःख
**समा** – समान
**सोबती** – मैत्रीने, संगतीने

## २. ऋतुचित्र

**अनंत** – अनेक, अगणित
**अंगप्रत्यंग** – पूर्ण शरीर
**दिव्य** – तेजस्वी
**दुतर्फा** – दोन्ही बाजूंस
**पल्लवित** – नवीन पालवी आणि अंकुर फुटलेले
**विपुल** – पुष्कळ, दाट
**हरित** – हिरवा

## ३. माझ्या गोव्याच्या भूमीत

**आरक्त** – लाल
**घाव** – जखमा
**पाझर** – झिरपण (रसाची)
**भाव** – स्वभाव
**लोचनांनी** – डोळ्यांनी
**शालीन** – नम्र

## ४. पाणी-पाणी

**अर्भक** – लेकरू
**कोरे आभाळ** – ढग नसलेले (निरभ्र) आकाश
**तिष्ठणे** – वाट पाहणे
**थाळा** – जेवणाचे मोठे ताट
**पोरका** – आईवडील नसलेला
**आभाळाची भट्टी तापणे** – कडक ऊन पडणे
**मलूल** – कोमेजलेले
**वाडगा** – मोठी वाटी

## ५. संतवाणी

**इंद्रावन** – कवंडळाचे झाड, फळ
**कवण** – कोण
**कळा** – सोंगे
**नलगे** – लागत नाही
**निवाडा** – न्याय
**परीक्षावे** – पारखावे (पारखून घ्यावे)
**बचनाग** – एक विषारी झाड किंवा त्याचे मूळ
**भोंदू** – ढोंगी, दांभिक
**युक्ष** – ऊस
**विषय** – विकार (इच्छा-आकांक्षा)
**वैराग्य** – इच्छा-आकांक्षांचा त्याग
**वोंगळ** – ओंगळ, घाणेरडे
**सोहळा** – मौज

## ६. सागरास

**अन्य** – दुसऱ्या
**आचमन** – तळहातावर पाणी घेऊन पिणे
**वत्सलता** – वात्सल्य, जिव्हाळा
**उद्धरणी** – सुटका करण्यात, मुक्त करण्यात
**चरणतल** – पायांचे तळवे
**जगदनुभव** – जगातले अनुभव
**तई** – तेव्हा
**तद्विरह** – तिची ताटातूट
**तमोमय** – अंधाऱ्या
**नवकुसुमयुता** – नव्याने फुललेल्या
**पृष्ठी** – पाठीवर
**पंजरी** – पिंजऱ्यात
**फेनमिषे** – फेसाच्या रूपाने
**मार्गज्ञ** – वाटाड्या
**व्यय** – खर्च
**शक्त** – समर्थ, योग्य, लायक, शक्तिमान
**शुक** – पोपट
**सरित्पती** – सागर
**साहणे** – सहन करणे, सोसणे
**सुलता** – सुंदर (चांगल्या) वेली
**हृद** – हृदय, अंतःकरण

## ७. किनारा

**अतृप्त** – असमाधानी, असंतुष्ट
**आभासमान** – खोटे, काल्पनिक
**घननाद** – गरजणारा आवाज
**घननीळ** – निळाशार
**चौफेर** – चारी बाजूंस
**जलधी** – समुद्र
**तेजभारे** – तेजाने
**निवांत** – शांत
**लहरी** – लाटा
**सान्निध्य** – जवळीक, सहवास
**सावरणे** – सांभाळणे
**संकेत** – इशारे

## ८. प्रकाश

**दमन** – दडपशाही
**दैन्य** – दारिद्र्य
**धुपु दे** – धुमसू दे
**पीडिताक्रंदन** – दुःखितांचे, पीडलेल्यांचे रडणे
**हरील** – नाहीशी करील

## ९. तुतारी

**त्वरा** – तातडी
**दंभावर** – ढोंगावर
**द्वाही फिरवणे** – सगळीकडे जाहीर करणे
**भूधर** – पर्वत
**मेद** – चरबी
**विक्रम** – पराक्रम

## १०. मी फूल तृणातिल इवले

**मृदु** – कोमल
**रेशमी नाते** – स्नेहाचे नाजूक नाते
**सजल** – ओलसर
**हेतू** – मनातला उद्देश

## ११. दुपार

**कवडसे** – खिडकीतून, छपरातून, पानांच्या जाळीतून येणाऱ्या प्रकाशाची किरणे
**पाकोळ्या** – (कपड्यांच्या) पतंगासारख्या आकृत्या
**पेंगुळणे** – झोपेला येणे, आळसावणे
**बावरे** – बुजरे
**विरणे** – दिसेनासे होणे
**सुस्त** – आळसावलेला

## १२. जीवितमहिमा

**आर्यावर्त** – भारत
**काया** – शरीर
**जीवित** – जीवन
**प्रतिदिनी** – प्रत्येक दिवशी
**पुलिनी** – वाळवंटात
**महिमा** – थोरवी
**विश्व** – जग
**समर** – युद्ध
**सरणी** – पद्धत
**सादर** – आदराने



